








नोंदणी क्र. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत**.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई संचालित मासिक

# नवभारत

वर्ष ५२ । अंक ८ । मे १९९९
वैशाख-अ.ज्येष्ठ, शके १९२०
किंमत रु. २०/-
वार्षिक वर्गणी रु. २००/-

या अंकातील लेखांत व्यक्त झालेल्या मतांशी संचालक व संपादक सहमत असतीलच, असे नाही.

## *नवभारत*ची भूमिका*

मानवाच्या व मानवसंस्कृतीच्या विकासास व उन्नतीस पोषक होईल अशा प्रकारे महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणे, हे या मासिकाचे ध्येय व उद्दिष्ट आहे.

ध्येयप्रवण व्यक्तींनी स्वोन्नतीच्या हेतुपूर्तीसाठी जे आपले सांस्कृतिक मूल्यमापन ठरविलेले असेल, उच्च वातावरणातील जो अभिजात अनुभव स्वतःच्या साधनेने संगृहीत केलेला असेल, त्याचे दिग्दर्शन हेच संस्कृतिपोषक वाङ्मय होऊ शकते, असा संचालक व संपादक-मंडळ यांचा विश्वास आहे.

या मासिकात येणाऱ्या लेखांत कोणत्याही विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा पंथाचा प्रचार करण्याचा हेतू नाही.

संचालक व संपादक-मंडळातील सर्व व्यक्ती यांचेही सर्व विषयांत मतैक्य आहे, असे नाही. मानवी जीवनविषयक व सांस्कृतिक मूल्यांसंबंधी सदृश अशा दृष्टिकोणानेच त्यांना एकत्र आणले आहे. तथापि प्रत्येकाचे व्यक्तिवैशिष्ट्य व विचारस्वातंत्र्य यांचा विनाश न होता विकास व्हावा या दृष्टीनेच त्यांचे सहकार्य राहील. प्रत्येक व्यक्ती आपल्या नावाने प्रसिद्ध होणाऱ्या लेखाबद्दलच जबाबदार राहील.

मासिकात प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लिखाणात सत्यनिष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील अशी काळजी घेतली जाईल.

* *नवभारत*, ऑक्टोबर, १९४७, वर्ष १ ले, अंक १ मधील कै. शंकरराव देव यांच्या 'संचालकांचे मनोगत' मधून.

**प्राज्ञपाठशाळामंडळ**
**अध्यक्ष व विश्वस्त :**
मे.पुं. रेगे

**संपादक :**
वसंत पळशीकर

**साहाय्यक संपादक :**
अ.र. कुलकर्णी, एस्.डी. इनामदार,
अ.ना. ठाकूर

**संपादकीय पत्रव्यवहार :**
वसंत पळशीकर
संपादक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळामंडळ,
वाई – ४१२ ८०३ (जि. सातारा).

**व्यवस्थापकीय पत्रव्यवहार :**
श्री.ग. दीक्षित
व्यवस्थापक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळामंडळ, ३१५ गंगापुरी,
वाई – ४१२ ८०३ (जि. सातारा)

महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाने या नियतकालिकाचा मंडळाच्या "नियतकालिकांचा स्थायी निधी" योजनेत समावेश केला असला तरी या नियतकालिकातील लेखकांच्या विचारांशी मंडळ व राज्य शासन सहमत असेलच, असे नाही.

अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# नवभारत

## अ नु क्र म



मुखपृष्ठ : सुजित पटवर्धन



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास




अनुक्रमणिका

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# भ्रष्टाचार निर्मूलनाचे आव्हान आणि नीतिमीमांसेची निकड

भ्रष्टाचार हाच आज शिष्टाचार झाला आहे ही गोष्ट खोटी नाही. जीवनव्यवहाराचा थोडाही स्वानुभव असणाऱ्यांना हे सत्य पटवून द्यायला लागत नाही; ते त्यांना पटलेलेच असते.

शिष्ट लोक व्यवहाराची 'नॉर्मल' रीत म्हणून भ्रष्ट आचार करतात असाही याचा अर्थ होतो. आता, 'नॉर्मल' या इंग्रजी शब्दात एकाहून जास्त अर्थ भरलेले आहेत. नेहमीची रीत, निरोगी अविकृत रीत हे दोन अर्थ तर आहेतच. पण, 'नॉर्म' या शब्दाच्या अर्थाच्या अंगाने विचार केल्यास, योग्य, मानदंड म्हणून स्वीकारता येण्याजोगी रीत असाही अर्थ घेता येतो. भ्रष्टाचार शिष्टाचार होतो याचा मग एक अर्थ असाही की, ज्याला भ्रष्टाचार म्हटले जाते त्यात भ्रष्टता वास्तविक नाहीच; वागण्याची ती रीत तशी योग्यच आहे. माणसे स्वभावतः जशी वागतील तसेच हे वर्तन असते.

स्वतःचा फायदा कशात आहे, स्वार्थ कशात आहे ते पाहावे; जास्तीत जास्त फायदा/स्वार्थ पदरात पाडून घेण्याचा यत्न करावा; यासाठी धडपडत असता जास्तीत जास्त परिणामकारक ठरणारी साधने वा मार्ग यांचा वापर करावा, आपल्यापुरते पाहावे, इतरांचा विचार करू नये – माणसाची मूळ, खरी व नित्याची स्वभावप्रकृती ही आहे, ही मानवी स्वभावप्रकृतीची एक प्रतिष्ठित उपपत्ती आहे.

भ्रष्टाचार शिष्टाचार कधी होतो? या प्रश्नाचे उत्तर दोन प्रकारे देता येईल. समाजातील जास्त जास्त व्यक्ती, योग्य काय, कर्तव्य काय, नैतिक काय याची पर्वा न करता आपल्या फायद्याचा, स्वार्थाचा तेवढा विचार करून वागू लागतात तेव्हा असे घडते. तसेच, जेव्हा समाजात ज्यांना शिष्ट, प्रतिष्ठित, धुरीण म्हणून मान्यता असते तीच मंडळी जेव्हा सर्रास भ्रष्ट वर्तन करू लागतात, आणि स्वतःच्या तशा वागण्याचे राजरोस समर्थन करू लागतात तेव्हा असे घडते.

समाजातल्या बलवान व्यक्तींनाही, सर्वस्वी असुरक्षिततेची भयप्रद परिस्थिती, अशा परिस्थितीत उत्पन्न होणारा धोका टाळावयाचा असतो. यासाठी 'कायदा आणि सुव्यवस्था' राखली जाण्याची गरज त्यांनाही असते. यासाठीही एक प्रकारचा नीतिविचार, त्यावर आधारित नीतिनियम यांची त्यांनाही गरज असते. 'उन्नत स्वार्थ' ही या नीतिविचाराची बैठक असते. कायद्याची चौकट त्यांना सोयीचीही असते. 'बळी तो कान पिळी' हा जर 'न्याय' अनिर्बंध स्वरूपात लागू असला तर कोणत्याच व्यवहारावर 'गैर' असा शिक्का मारता येणार नाही. कायद्याची चौकट असेल, आणि तो लागू करण्यासाठी न्यायव्यवस्था असली, अंमलबजावणीसाठी शासनसंस्था (पोलिसयंत्रणा इ.) असली तर सोय कोणती असते? कायद्यानुसार जी कृत्ये गैर, गुन्हेगारीची ठरविलेली असतात ती कृत्येही कायदा, शासनसंस्था यांच्या जाळ्यात न सापडता (या यंत्रणांना काणाडोळा करण्यास प्रवृत्त करून, वा गुन्हेगारी शाबीत करण्यासाठी कोर्टात वा अन्यत्र आवश्यक असणारा पुरावा नष्ट करून, वा अन्य प्रकारे) करता आली तर, अशी कृत्ये करून व त्यांच्यापासूनचा लाभ पदरात पाडून घेऊनही, शिष्टमान्य नीतिनियमांच्या चौकटीत राहून, त्यांचा आदर करून वर्तन करणारे आपण सभ्य व प्रतिष्ठित गृहस्थ आहोत, अशी बलवानांना स्वतःची प्रतिमा जोपासता व टिकविता येते. त्या त्या काळातले कायद्याच्या पुस्तकात असलेले कायदे मोडल्याबद्दल शिक्षा झालेली नसते तोपर्यंत माणूस सभ्य, कायद्याचे पालन करणारा, प्रतिष्ठित आहे असे गृहीत असते.

'उन्नत स्वार्थ' हीच जेव्हा व जेथे व्यवहारातल्या कायदा व सुव्यवस्था यांची बैठक असते तेथे आणखीही एक विशेष आढळतो. समाजातील काही लोकांचे बळ (सत्तेचे, धनाचे, प्रतिष्ठा-कीर्ती-खानदान यांचे, वा झुंडीच्या पाठिंब्याचे) हे असे व इतके असते की, अशी व्यक्ती कायद्याच्या कचाट्यात सापडली, तिने गुन्हा केल्याचे शाबीत झाले, आणि शिक्षाही झाली, तरी त्या व्यक्तीचे समाजातले स्थान, तिची प्रतिष्ठा, तिचे बळ, तिची 'सभ्य व सुसंस्कृत' म्हणून प्रतिमा यांना धक्का लागत नाही. उदाहरणार्थ, अनेक उद्योगपती, डेव्हलपर-बिल्डर्स, व्यापारी यांचे गैरव्यवहार लोकांच्या परिचयाचे, अनुभवाचे असतात. पण, त्यांच्या त्यांच्या वर्तुळात 'हुशारीने स्वार्थ साधण्यात कमी पडले' अशी प्रतिक्रिया होते, किंवा व्यवहारात एवढे तर करावेच लागते, अशी.

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अनेक वेळा, 'मी केला तो आचार भ्रष्ट होता, पण गत्यंतर नव्हते; मला तसे वागणे भागच होते' अशा शब्दांत माणसे आपल्या वागण्याचे स्पष्टीकरण करतात. किंवा, 'मी भ्रष्ट आचार करावयास हवाच होता असे नाही; पण भ्रष्ट आचार न करण्याचा मी आग्रह राखला असता तर मला काही लाभांवर पाणी सोडावे लागले असते (वा मला झीज सोसावी लागली असती) आणि या गोष्टीस माझी तयारी नव्हती' अशी कबुली अपराधी भावनेने माणसे देतात. पण भ्रष्टाचार हा शिष्टाचार होतो तेव्हा, बहुतेक वेळा ही शिष्ट, प्रतिष्ठित, बलिष्ठ मंडळी आपण भ्रष्ट, आचार करीत आहोत हा आरोप फेटाळून लावतात. ज्या निकषांवर त्यांच्या वागण्याचा 'अयोग्य, भ्रष्ट, अनैतिक' असा निवाडा केला जातो ते निकष व त्या निकषांमागील नीतिविचार यालाच ते जुनाट, कालबाह्य व/वा 'अशास्त्रीय' ठरवितात. आपण जसे वागतो तसे वागणे हेच मनुष्यस्वभावप्रकृतीनुसार आहे आणि याच प्रकारच्या वागण्यामधून समाजाची भरभराट, प्रगती घडून येत असते असे आग्रहाने प्रतिपादन करीत असतात. गोची अशामुळे होते की, ही मंडळी राज्यकर्ती, समाजधुरीण, धनवान, बलिष्ठ असतात. आणि यामुळे त्यांचे बोलणे-वागणे यांना स्वाभाविक व अटळ असे वजन प्राप्त होते, प्रामाण्य प्राप्त होते. नैतिक काय, अनैतिक काय याविषयी लोकांच्या मनात गोंधळ उत्पन्न होतो. नीतिविषयक पारंपरिक धारणांविषयीची खात्री उरत नाही.

कर्तव्य, नैतिकता, निःस्वार्थ, सर्वांचे हित, इतरांचा अधिकार, त्याग, सेवा या सर्व संकल्पना या दुबळ्या, कर्तृत्वहीन, आळशी, चुकार वगैरे असणाऱ्या, गुणांच्या दृष्टीने सामान्य असणाऱ्या लोकांनी स्वतःच्या स्वार्थापोटी प्रसृत केलेल्या संकल्पना असतात; आपण जर बलवान असलो तर (किंवा बलवान व्हावयाचे असेल तर), स्वतःची भरभराट व उत्कर्ष साधावयाचा असेल तर, या संकल्पना आपल्या मनावर स्वार होऊ देता कामा नयेत, त्यांच्या रूपाने 'बेड्या' हातापायांमध्ये अडकवून घेता कामा नयेत, ही धारणा आज भारतातल्या वरिष्ठ, वरचढ व बलवान व्यक्ती व वर्ग यांच्या ठायी दृढपणे रुजत चाललेली आढळते. व्यवहार हा 'रोखठोक'च असतो व असायला हवा; तिथे उगाचच नीतिअनीतीच्या, कर्तव्यांच्या पुस्तकी गोष्टी आणू नयेत, असे मान्य होत चालले आहे. भौतिक लाभ, यश, सत्ता, कीर्ती यांचे संपादन हे उद्दिष्ट कितपत साध्य झाले यालाच व्यवहारात प्रथमतः व अंतिमतःही महत्त्व असते असे आग्रहाने म्हटले जात आहे.

मात्र त्याच वेळी कायदेकानू हे बलवानांच्या हातातले एक प्रभावी साधन पण असते. जे गोरगरीब, दुबळे, शोषित, वंचित असतात त्यांच्यावर वर्चस्व गाजविण्यासाठी, त्यांना कावूत ठेवण्यासाठी, त्यांना 'नैतिक धाका'त ठेवण्यासाठी कायदेकानू, 'कायदा व सुव्यवस्था' ही संकल्पना यांचा बलवानांना फार उपयोग असतो.

आज भारतीय समाज या परिस्थितीत सापडला आहे असे, थोडे थंड डोके ठेवून पाहिले असता, ध्यानात येईल.

भ्रष्ट, अनैतिक वर्तन कोणते याविषयी समाजात व्यापक ऐक्यमत असते तेव्हा कोणाचा कोणता आचार भ्रष्ट आहे याविषयी दुमत नसल्याने, म्हणजे भ्रष्ट वर्तन करणाऱ्यांचेही स्वतःच्या वर्तनाबद्दल तेच मत असल्याने, भ्रष्टाचार निर्मूल करणे तुलनेने सोपे जाते. भ्रष्टाचारनिर्मूलनाच्या कार्यात भ्रष्ट वर्तन करणाऱ्यांच्या ठायी असलेल्या अपराधी भावनेने साहाय्यच होते. ही अपराधी भावना नसली, वा असलीच तर अतिशय क्षीण असली, तर मामला कठीण बनतो.

– २ –

अहमदनगर जिल्ह्यातील राळेगण शिंदी (नव्या नामकरणानंतरचे, आजचे राळेगण-सिद्धी) या गावाचा कायापालट घडवून आणण्याचे महनीय कार्य पार पाडलेल्या आदरणीय श्री. अण्णा हजारे यांच्या पुढाकाराने व त्यांच्या नेतृत्वाखाली महाराष्ट्रात भ्रष्टाचारनिर्मूलन मोहीम गेली काही वर्षे चालू आहे. आरंभीच्या काळात अण्णांच्या सभांना महाराष्ट्रभर अभूतपूर्व प्रतिसाद लोकांकडून मिळाला. तालुका व जिल्हा पातळीवर समित्यांचे संघटन झाल्याच्या बातम्याही प्रसिद्ध झाल्या. कार्यकर्त्यांचे यासाठी प्रशिक्षण केले जाणार असल्याच्या (वा प्रशिक्षण शिबिरे पार पडल्याच्या) बातम्याही आल्या. प्रा. ग. प्र. प्रधान, डॉ. बाबा आढाव, श्री. अविनाश धर्माधिकारी व इतर अनेक नामवंत मंडळी अण्णांच्या साथीला धावून गेल्याचे दृश्य दिसले. महाराष्ट्रव्यापी सुसंघटित व प्रशिक्षित यंत्रणेच्या माध्यमाद्वारे शासकीय खात्यांच्या, योजनांच्या भ्रष्टाचाराला लौकरच पायबंद बसणार असे एक विलक्षण उत्तेजक वातावरण निर्माण झालेले आपण अनुभवले. खुद्द अण्णांनी *साधना* साप्ताहिकात


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अनुक्रमणिका

(३ एप्रिल १९९९) प्रसिद्ध झालेल्या त्यांच्या मुलाखतीत 'संघटनेच्या कामाने गती पकडलेली नाही' असे म्हटले आहे. "काटकसरीने चळवळ चालविण्यासाठी देखील जेवढे पैसे लागतात तेवढे आमच्याकडे नाहीत," असे त्यांनी याचे आंशिक स्पष्टीकरण दिले आहे. त्यांनाही या कामासाठी पुरेसा वेळ देता आलेला नाही, असेही आणखी एक आंशिक स्पष्टीकरण. बाहेरून पाहणाऱ्या व्यक्तीस, मोहिमेच्या स्वरूपात आज काही काम चालल्याचे आढळत नाही असे म्हटले तर वावगे ठरणार नाही.

अलीकडे पुणे महानगराच्या रहिवाशांनी श्री. अरुण भाटिया यांची महानगरपालिकेच्या आयुक्तपदावरून तडकाफडकी झालेली बदली रद्द व्हावी या मागणीच्या पूर्ततेसाठी चळवळ चालविली. जेथे यांची नेमणूक होईल त्या शासकीय/निम-शासकीय यंत्रणेतील भ्रष्ट आचाराची प्रकरणे उजेडात आणण्याचे काम जवळजवळ कर्तव्यभावनेने पार पाडणारे सनदी प्रशासक म्हणून श्री. भाटिया यांनी ख्याती संपादन केली आहे. भरभराटत असलेल्या सगळ्याच लहानमोठ्या शहरांमध्ये अनधिकृत बांधकामे मोठ्या प्रमाणावर केली जात आहेत ही वस्तुस्थिती आहे. यात मोठे बिल्डर, राजकारणी नेते, समाजातील प्रतिष्ठित मंडळी, प्रशासन यंत्रणेतील सनदी अधिकाऱ्यांपासून अनेक अधिकारी यांची हातमिळवणी आहे ही गोष्टही लोकांना परिचित आहे. अलीकडे अनधिकृत बांधकामे पाडण्याच्या धडक-मोहिमा अनेक मोठ्या शहरांमध्ये तेथील सनदी प्रशासकांनी हाती घेतल्या. या मोहिमांमुळे आपल्या शासनाची प्रतिमा लोकमानसात उजळून निघते याचे भानही राज्यकर्त्या पक्षांच्या नेत्यांना असल्याने, शासन सनदी प्रशासकाच्या पाठीशी उभे राहिल्याचे दृश्यही दिसत आले आहे. अनधिकृत बांधकामे, तीही बड्यांची वा बड्यांच्या आश्रयाने केलेली, बेधडकपणे पाडण्यासाठीच केवळ भाटियांची बदली झाली नाही. प्रशासनयंत्रणेतील, म्हणजे किल्ल्याच्या 'आतल्या' पक्षाचे एक वरिष्ठ व जबाबदार अंमलदार असूनही त्यांनी, आधी पुणे महसूल विभागाचे आयुक्त म्हणून, आणि तिथून पुणे महानगरपालिकेच्या आयुक्तपदी उचलबांगडी केली गेल्यावर त्या जागेवरून धर्मयुद्धावर निघालेल्या योद्ध्याला ('क्रूसेडर') शोभेल अशा पद्धतीने भ्रष्टाचार उघड पाडून तो निर्मूल करण्याची मोहीम सनदी प्रशासक व राजकारणी नेते यांना न जुमानता हाती घेतली. जनहितार्थ शासनाचा व्यवहार पारदर्शक, स्वच्छ व चोख असला पाहिजे, पाणी कोठे मुरते आहे हे नागरिकांना कळले पाहिजे, माहीत करून घेता आले पाहिजे, अशी त्यांनी आग्रही व आक्रमक भूमिका घेतली. भाटिया यांच्या या 'अपराधा'ला क्षमा नाही. वेलगाम राजकारणी नेत्यांना वेसण घालण्यामुळे खातकीर्त झालेल्या माजी निवडणूक आयुक्त श्री. शेषन यांनीही, भाटियांचेच कसे चुकले यावर भर दिला, व त्यांचे वर्तन कसे अक्षम्य होते हेच त्यांच्या शैलीत सांगितले, यावरून हा 'अपराध' जवळपास राजद्रोहाइतका गंभीर गुन्हा मानला गेला आहे ही गोष्ट उघड होते. सनदी प्रशासकांसाठीच्या आचारसंहितेच्या चौकटीत गंभीर मानला जाणारा प्रमाद – प्रशासनयंत्रणेतील ज्येष्ठतम पदाधिकारी भ्रष्टाचाराला पायबंद घालू इच्छित नाहीत, हे त्यांचे कर्तव्य पार पाडायला ते कसे तयार नाहीत, ही गोष्ट लोकांना उघड करण्याचा प्रमाद – आपण जाणूनबुजून करीत आहोत याचे भान भाटियांना होतेच. आजपर्यंत त्यांच्या इतक्या वेळा बदल्या झाल्या त्यावेळी ही विशिष्ट कृती त्यांनी केली नव्हती. प्रस्थापित आचारसंहितेचा भंग करून लोकांसमोर सनदी प्रशासनसेवेचे जनताद्रोही स्वरूप उघड पाडावे असा मनाचा निर्णय त्यांचा झाला. शासकीय प्रशासनयंत्रणा व तिला हाताशी धरून कामे करून घेणारे राजकारणी पुढारी [ज्यांपैकी काही शासनाचा (लोकनिर्वाचित) भागच असतात] यांनी भ्रष्टाचाराची अशी हद्द गाठलेली त्यांनी अनुभवली की, त्यांचा सात्त्विक संताप होऊन सनदी नोकरांसाठीची आचारसंहिता धाब्यावर बसवून पण लोकांसमोर सत्य परिस्थिती ठेवावी याची नितांत गरज त्यांना वाटली.

आचारसंहितेचे पालन करावे हे सनदी प्रशासक म्हणून आपले सामान्य स्थितीत कर्तव्य आहे हे भाटियांना अमान्य नसावेच. पण 'कधीकधी वेळच अशी येते की, या कायद्यापेक्षाही उच्चतर नैतिक कायद्याचे पालन करणे हे असामान्य स्थितीत कर्तव्य बनते, व तशी वेळ आज आली आहे,' अशी भाटिया यांची भूमिका दिसते. महात्मा गांधींनी १९२० सालच्या असहकार आंदोलनाची स्वतःची कारणमीमांसा करताना याच आशयाचा युक्तिवाद केला होता याची आठवण व्हावी. भाटिया यांच्या कृतीमागच्या या उच्चतर नैतिक भूमिकेचा स्पर्श होऊन पुण्याचे नागरिक चळवळ करण्यास उद्युक्त झाले. श्री. अरुण भाटिया व याप्रकरणी सक्रिय झालेले पुणेकर नागरिक हे अभिनंदनास पात्र आहेत.

पण हीदेखील वस्तुस्थिती आहे की, वेगवेगळ्या कारणांनी,

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

'भाटिया यांना पुन्हा महानगरपालिका आयुक्तपदी नेमले जावे' या विशिष्ट मागणीभोवती आजची नागरिक कृती समिती संघटित झालेली आहे. तशीच वेळ आली तर, भाटियांची पुण्यात परत नेमणूक करून स्वतःच्या शासनाची प्रतिमा उजळवून घेण्याची याला खेळली जाणारच नाही असे नाही.*

मुद्दा असा की, श्री. अण्णा हजारे यांची मोहीम असो की पुणेकर नागरिकांची चळवळ असो, व्यापक व सार्वत्रिक परिणाम साधण्याच्या दृष्टीने त्या शक्तिमान ठरत नाहीत. या कृती, त्या कृतींमागील उद्दिष्टे आणि या कृतींमध्ये असलेल्या मुख्य व्यक्तींचे चारित्र्य यातील उणेपणा हे याचे मुख्य कारण नाही. नीती-अनीतीविषयीच आज लोकमानसाचा गोंधळ माजविण्यात समाजाची सूत्रे हाती असलेली बलिष्ठ, शिष्ट मंडळी यशस्वी ठरलेली आहेत हे अधिक मोठे कारण आहे.

– ३ –

नीति-अनीतीविषयक धारणांच्या क्षेत्रात अशी गोंधळाची स्थिती भारतात आज उत्पन्न झाली आहे या वस्तुस्थितीची दखल प्रथमतः घेतली पाहिजे. अशी परिस्थिती कधी व का निर्माण होते?

एखादी समाजव्यवस्था दीर्घकाळ स्थिर असते, म्हणजे तिच्यात होणारे बदलही मंद गतीने, मूळ संरचनेला मुळातून धक्का न देता होत राहतात, तेव्हा त्या समाजव्यवस्थेची धारणा करणारा नीतिविचारही स्थिर स्वरूपात रुजलेला असतो. उदा., जातपात-व्यवस्था हा भारतीय समाजाचा संरचनात्मकदृष्ट्या कणा होता. या व्यवस्थेशी जोडलेला, तिला आधारभूत, व भक्कमपणा आणून देणारा नीतिविचार होता. नैतिक वर्तन कोणते, कोणत्या प्रसंगी कोणी कसे वागावे या गोष्टी सर्वांना स्पष्ट होत्या. जातपातव्यवस्था हजारो वर्षे अगदी जशीच्या तशी राहिली ही वस्तुस्थिती नाही. पण शेकडो वर्षांनंतरही मुख्य संरचना मूलतः कायम राहिली.

आता, वेगवेगळ्या कारणांमुळे एका अल्प कालावधीत समाजात मोठे व सर्वगामी बदल घडून आले व समाजाची वसलेली घडी विस्कटली की नीतिविचारालाही मुळापासून हादरे बसतात. तो कामही समाधानकारकपणे देऊ शकत नाही. बदलत्या समाजजीवनाबरोबर नव्या समस्या, नवी आव्हाने उपस्थित झालेली असतात. यामधून गोंधळाची परिस्थिती उत्पन्न होते.

भारताला स्वातंत्र्य मिळाल्यानंतर भारतीय समाजाची जुनी घडी मोडून नव्या आराखड्यानुसार समाजाची उभारणी करण्याची घडामोड बुद्ध्या आपण हाती घेतली. इंग्रजांच्या अमलाखाली अर्थव्यवस्था, राज्यव्यवस्था, समाजव्यवस्था यांच्यात बदल घडवून आणण्यास सुरुवात झाली. पण गती मंद होती. १९४७ नंतर परिवर्तनाने वेग घेतला. प्रौढ मताधिकारावर आधारलेली, निवडणुकांच्या यंत्रणेद्वारा प्रतिनिधी निवडून त्यांच्या हाती सत्ता सुपूर्द करणारी, व्यक्ती व राज्यसत्ता यांच्यात थेट संबंध प्रस्थापित करणारी लोकशाही राज्यव्यवस्था आपण प्रस्थापित केली. आर्थिक-औद्योगिक क्षेत्रात वेगवान आर्थिक-औद्योगिक आधुनिकीकरणाचे, उत्पादनवाढीचे उद्दिष्ट बाळगून पंचवार्षिक

* या प्रकरणी काही नागरिकांनी 'सार्वजनिक हिता'चा मुद्दा उपस्थित करून उच्च न्यायालयाकडे दादफिर्याद मागितली होती. उच्च न्यायालयाने १३ एप्रिल १९९९ रोजी निकाल दिला. श्री. अरुण भाटिया यांची बदली अवैध ठरवून, त्यांना महानगरपालिकेच्या आयुक्तपदी पुन्हा पाठवावे, असा आदेश न्यायालयाने दिला.

पुणेकर नागरिकांनी जी चळवळ चालविली ती आपण विचारात घेत नाही, बदली करण्याच्या समर्थनार्थ शासनाने जी कारणे पुढे केली ती योग्य व न्याय्य आहेत की नाही, याबाबतीतले नॉर्मल संकेत व रीती धाब्यावर बसवून हितसंबंधी कारणांनी बदली केली का, या मुद्यावरच न्यायालयाने लक्ष केंद्रित केले. ही स्पष्टता न्यायमूर्तींनी निकाल देताना केली.

खूप लोक दीर्घ काळ चळवळ करीत आहेत त्याअर्थी ते करीत असलेल्या मागण्या योग्य, न्याय्य व नैतिक असल्याच पाहिजेत, या भूमिकेतून योग्य काय, न्याय्य काय, नैतिक काय या प्रश्नाचे उत्तर देता येत नाही, हा मुद्दा न्यायमूर्ती करीत असल्यास तो योग्यच आहे.

विभिन्न प्रकारचे बळ स्वतःपाशी असल्याने 'बळी तो कान पिळी' हाच न्याय होय, असे प्रस्थापित करू पाहणाऱ्या बलवानांच्या विरोधात लोकांच्या उत्स्फूर्त नैतिक संवेदनशीलतेमधून व नीतिविवेकामधून उभ्या राहणाऱ्या चळवळींचे आपले एक स्वतंत्र महत्त्व आहेच आहे. पण एक कडक पथ्य आहे. अयोग्य, अन्याय्य अनैतिक वर्तनाचा, धोरणाचा, कृतीचा प्रतिकार नीतीच्या प्रस्थापनेसाठी असेल तर (१) नीतिविवेक हा समूह/वर्ग/व्यक्ती सापेक्ष नसतो, ही भूमिका अंगिकारलेली असली पाहिजे आणि (२) चळवळीमध्ये नीतिविवेक पाळला गेला पाहिजे.

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

योजनांद्वारे, पण बाजारपेठेवर अधिष्ठित अर्थ-व्यवस्थेची चौकट न मोडता, विकास घडवून आणण्याचा महत्त्वाकांक्षी कार्यक्रम राबविला. सामाजिक-आर्थिक न्याय व समता ही उद्दिष्टे साधण्यासाठी राज्यसत्तेने सर्वदूर हस्तक्षेप करण्याची भूमिका अंगिकारिली. व्यक्तिस्वातंत्र्याच्या तत्त्वावर समताधिष्ठित व्यक्तिवादी समाजरचना उभारण्याच्या भूमिकेमधून जात, जमात, गाव यांचे प्रामाण्य व स्थान औपचारिक पातळीवर नाकारले. शहरीकरणावर आर्थिक व सामाजिक-सांस्कृतिक दृष्ट्या मोठा जोर देण्यात आला. आधुनिक तंत्रविज्ञानाच्या स्वीकारावरही खूप भर दिला. १९५० नंतरच्या काळात पाश्चात्त्य सधन राष्ट्रांशी सर्व प्रकारची देवाणघेवाण वाढली. केवळ ज्ञान-विज्ञान-तंत्रविज्ञान आपण आयात केले नाही. चांगल्या, समृद्ध जीवनविषयक कल्पना, तिकडच्या जीवनशैली, आकांक्षा यांचीपण आयात झाली. भारतात एक आदर्शात्मक लोकशाही समाजवादी समाज अस्तित्वात आला नाही; जातपात, स्पृश्यास्पृश्यता, जुन्या कालबाह्य रूढी, अंधश्रद्धा, विधी, कर्मकांड या स्वरूपातला धर्म या गोष्टींची पकड पूर्ण सुटली नाही. आणि म्हणून ध्येयवादी मंडळींना खूप असमाधान असावे ही गोष्ट स्वाभाविक आहे. पण गेल्या पन्नास वर्षांमध्ये ज्यांची भरभराट झाली व ज्यांची हलाखी तशीच राहिली, जे शहरांमध्ये आले आणि जे खेड्यांमध्ये राहिले, जे चातुर्वर्ण्याची शिडी चढून 'उच्चवर्णीय' बनले व जे तळागाळाशीच शूद्रातिशूद्र स्थितीत राहिले त्या सर्वांच्याच जीवनातील उत्पातकारी बदल पाहिले, त्यांचे परिचित जग उद्ध्वस्त झाल्याचे लक्षात घेतले म्हणजे भौतिक, मानसिक, वैचारिक सर्वच दृष्टींनी परिस्थिती किती अस्थिर, असुरक्षित व गोंधळात टाकणारी झाली आहे याची कल्पना करता येते.

भारतात जे विभिन्न धर्म आहेत त्या सर्वांची नैतिक शिकवण, नीतिविचार अगदी एकसारखा नाही. पण त्या सर्वांना उद्देशून पारंपरिक नीतिविचार असा शब्दप्रयोग करता येईल. या पारंपरिक नीतिविचाराचे प्रामाण्य प्रश्नांकित झालेले आहे; व्यवहारात तो सर्व वेळी लागू करता येत नाही, लागू करू नये अशी वृत्ती-प्रवृत्तीही निर्माण झालेली आहे. पण सर्व समाजात एक नवा नीतिविचार मान्य झाला आहे, प्रतिष्ठित होऊन रुजला आहे असेही नाही. पारंपरिक व आधुनिक यांच्यात संघर्ष आहे; काही सोयीस्कर परस्पर जुळवणूक वा हातमिळवणी आहे. पण एकूण स्थिती गोंधळाची आहे. किंवा, नीतीच्या क्षेत्रात निर्नायकीची, अराजकसदृश परिस्थिती आहे; आणि लोकमानस गोंधळात सापडलेले आहे, असे म्हणा.

स्वातंत्र्योत्तर काळात जीवनाच्या वेगवेगळ्या अंगांमध्ये जे मोठे बदल घडून आले त्यांच्या गाभ्याशी काहीएक समान सूत्र आढळते. व्यक्तिस्वातंत्र्य, सर्व व्यक्ती समान, सर्व व्यक्तींचे मूलभूत हक्क व त्या हक्कांवर आधारित न्यायाची कल्पना, नागरिक-स्वातंत्र्ये या आधारे आपण लोकशाही समाज व राज्यव्यवस्था यांची उभारणी करीत आहोत. माणसाचे व्यक्तिमत्त्व कसे असावे याविषयीही संदेश पोचविला जात आहे. व्यक्तिवादी बनण्याचा तो संदेश आहे. समाजव्यवस्थेची बैठकही व्यक्तिवादी असावी ही गोष्ट आपण कळत वा नकळत स्वीकारलेली आहे. पुढे जाऊन असेही म्हणता येईल की, जे समाजवादी व साम्यवादी आहेत तेही खऱ्या अर्थाने समूहनिष्ठ नाहीत. एकत्र अविभक्त कुटुंब, गोतावळा/बिरादरी, जात, आळी, गाव, पंचक्रोशी, (पारंपरिक, ऐतिहासिक अर्थाने) 'देश' या प्रकारे वेगवेगळ्या स्तरांवर विभिन्न लहानमोठ्या, अनुरूप प्राथमिक व पायाभूत समुदायांच्या आधारे समाजाची बांधणी करण्याची कल्पना तेही करीत नाहीत. अर्थव्यवस्था व राज्यव्यवस्था यांची बांधणी केंद्रीभूत सर्वंकष नियंत्रण प्रस्थापित करण्याच्या दृष्टीने करण्यावर भर असल्याने 'समूहनिष्ठे'चा आभास होतो. पण वस्तुतः व्यक्ती हाच घटक म्हणून मान्य केलेला आहे. राज्यसत्तेने अन्य कोणत्याही सेंद्रिय, सावयवी समुदायाला मान्यता देऊ नये, हीच त्यांचीपण धारणा आहे.

आपण नेहमीच म्हणत असतो की, भारतीय समाजाची परंपरेने चालत आलेली बैठक धार्मिक आहे. येथील राज्ये-साम्राज्ये कट्टर धर्मसत्ता होत्या असे विधान सरसकट करता यावयाचे नाही. पण त्या इहवादी नव्हत्या हे निश्चित. देशात अनेक धार्मिक जमाती आहेत ही गोष्ट स्वतंत्र भारताची राज्यघटना मान्य करते. पण 'उंबरठ्याच्या बाहेर'चे सर्व व्यवहार इहवादी, निधर्मी भूमिकेतून चालावेत हा तिचा दूरगामी रोख नक्कीच आहे. आता, इहवादी भूमिकेचे सारभूत वेगळेपण व वैशिष्ट्य सर्व गोष्टी माणसेच, व्यक्ती एकेकट्याने वा व्यक्तींचे समूह, ठरवितात या धारणेत आहे. आपणास हवे ते, इष्ट वाटेल ते ठरविण्यास व्यक्ती मोकळ्या आहेत व मोकळ्या राहिल्या पाहिजेत. योग्य-अयोग्य, चांगले-वाईट, उदात्त-अनुदात्त असा भेद, या पदांचा आशय अशा सर्वच गोष्टी मानवी-निर्णयनिरपेक्ष, सनातन, स्थलकालनिरपेक्ष नसतात. माणसाला


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

बुद्धीचे वरदान आहे; बुद्धीच्या सहाय्याने व्यक्ती जो विवेक करतील तोच प्रमाण. हा सारासार विवेक करताना व्यक्तींनी स्वतःच्या इच्छा-कांक्षा, स्वतःचे सुख, स्वतःचा अभ्युदय, स्वतःचे लाभ यांना सर्वाधिक प्राधान्य द्यावे हे अटळ आहे. कारण तीच मानवी स्वभावप्रकृती आहे. आणि हे इष्टही आहे. आपले बुद्धिगम्य, ऐंद्रिय सुख वाढविण्यासाठी प्रत्येकाची धडपड असते. आणि तेच योग्य व इष्टही आहे. आजच्या शिष्टमान्य व्यक्तिवादी, इहवादी भूमिकेत हे सारे अनुस्यूत आहे.

नव्या समाजव्यवस्थेची उभारणी करण्यासाठी हा पाया निवडला त्यावेळी आपण पाश्चात्त्य समाजांचे अनुकरण करीत होतो. आधुनिकीकरणाच्या 'प्रकल्पा'चा तो एक आवश्यक भाग आहे असे आपण मानले. या पाश्चात्त्य आधुनिक समाजाकडे आपण दृष्टिक्षेप टाकणे उपयोगी ठरेल.

– ४ –

प्रा. ॲलस्डेअर मॅकिंटायर यांच्या *ए शॉर्ट हिस्टरी ऑफ एथिक्स* या ग्रंथातील विवेचनाचा परिचय करून देणारे *पाश्चात्त्य नीतीशास्त्राचा इतिहास** हे पुस्तक प्रा. मे.पुं. रेगे यांनी सिद्ध केले आहे. या पुस्तकाच्या 'आधुनिक समाजाकडे वाटचाल' या प्रकरणात प्रा. रेगे लिहितात, "व्यक्ती, स्वतःच्या हिताची कल्पना असलेली आणि ते प्राप्त करून घेण्याचा प्रयत्न करीत असलेली व्यक्ती, हे ह्या समाजाचे केंद्र आहे. समाज म्हणजे अशा सुट्या व्यक्तींचा समूह. आपापले हित साधण्याच्या व्यक्तिगत प्रयत्नांतून जो समग्र, गुंतागुंतीचा सामाजिक व्यवहार निर्माण होईल त्याचे नियमन करणारी सामाजिक संस्था म्हणजे राज्यसंस्था (स्टेट)". (पृ. ५२) "आधुनिक समाजाचे वैशिष्ट्य हे की, त्याच्यातील व्यक्ती स्वतःकडे केवळ एक व्यक्ती म्हणून पाहते, स्वतःच्या हिताच्या अनुरोधाने निर्णय घेऊन आपले सामाजिक स्वरूप स्वतःहोऊन स्वीकारते आणि इतर व्यक्तींशी असलेले आपले संबंध अशाच रीतीने निश्चित करते." (पृ. ५४)

आधुनिक काळाच्या आरंभी पारमार्थिक, आध्यात्मिक कल्याण आणि लौकिक सामाजिक जीवनाचे नियमन यांच्यात फारकत झाली. ऐहिक, सामाजिक जीवनाचे क्षेत्र स्वायत्त बनले. 'केवळ व्यक्तींचा समूह अशी समाजाविषयीची कल्पना मान्य झाली तर अशा समाजाची व्यवस्था कशी लावणार?' या व इतर संबंधित प्रश्नांची उत्तरे मॅकिआव्हेलीच्या विचारात आढळतात. रेगे लिहितात, "ह्या विचाराप्रमाणे राजकीय आणि सामाजिक कृतींची उद्दिष्टे ठरलेली आहेत. ती म्हणजे सत्ता संपादन करणे आणि राखणे;.... आपल्या कोणत्याही कृत्याने जर ही उद्दिष्टे साध्य व्हायला मदत होणार असेल तर ते कृत्य योग्य, आपण करावे असे, ठरते..... नीतिनियम म्हणजे, ज्या नियमांना अनुसरून आपण वागलो असता आपली उद्दिष्टे सिद्ध होतात असे तांत्रिक नियम असतात. ह्या पलीकडचे असे प्रामाण्य त्यांच्या ठिकाणी नसते... आपले उद्दिष्ट साध्य करण्यातील यश हीच केवळ कृत्यांच्या योग्यायोग्यतेची कसोटी, यशस्वी होण्यात खरी नीती सामावलेली असते." (पृ. ५७)

रेगे पुढे एके ठिकाणी लिहितात, "नीतिनियमांचे समर्थन करण्याची, परीक्षण करण्याची नवीन, 'आधुनिक' रीत कोणती? तर माणसांच्या गरजांचे ज्या कृत्यांमुळे समाधान होईल, माणसांच्या गरजांचे समाधान करायला जी कृत्ये उपयुक्त ठरतील ती कृत्ये चांगली किंवा नैतिक." (पृ. ६५) या भूमिकेवर टिप्पणी करीत रेग्यांनी म्हटले आहे, "माणसांच्या गरजांचे यशस्वीपणे समाधान करणारी कृत्ये म्हणजे नैतिक कृत्ये ही भूमिका आपण स्वीकारली तर त्याला भासणाऱ्या गरजांचे, त्याच्या ज्या काही इच्छा असतील त्यांचे नैतिक परीक्षण करण्याची शक्यताच आपण हरवून बसतो." (पृ. ६६)

थोडक्यात, समाजाच्या आधुनिकतेकडील वाटचालीत नीति-विचार हा व्यक्तिवादी बनला आणि व्यक्तीच्या गरजांचे, इच्छांचे, कांक्षांचे यशस्वीपणे समाधान यावर भर आला. आता, मानवी स्वभावप्रकृतीच अशी आहे की प्रत्येक व्यक्ती केवळ आपला स्वार्थ साधायला झटत असते, (ऐहिक) सुखात वाढ करण्यासाठी झटत असते, या धारणेची जोड नीतिविचाराला मिळाली की, ज्याने त्याने स्वतःचा स्वार्थ यशस्वीपणे साधण्यासाठी उपयोगी असे वर्तन व कृती करणे हे आपोआपच योग्य ठरते.

युरोपात मध्ययुगीन समाजव्यवस्थेकडून आधुनिक समाजाच्या निर्मितीकडे वाटचाल होत असताना येनकेनप्रकारेण पण यशस्वीपणे स्वार्थ साधणे हीच नीती, असा विचार पुढे आला. पण याचा समर्थ प्रतिवादही तत्त्वज्ञ-विचारवंत-समाजसुधारक-क्रांतिकारक यांच्याकडून होत आला आहे. रेगे यांनी एका ठिकाणी म्हटले आहे, "पण आपल्या अर्थाने (केवळ

* समाज प्रबोधन संस्था, पुणे, १९७४. लेखमालेच्या स्वरूपात प्रथमतः *समाज प्रबोधन पत्रिका* या नियतकालिकात प्रकाशन.

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अनुक्रमणिका

सुट्या व्यक्तींनी बनलेला) सर्वतोपरी आधुनिक असा समाज टिकू शकेल का? (व्यक्तिवादी) अशा समाजाच्या सामाजिक संस्था, नैतिक कल्पना, मूल्ये, व्यक्तींना एकत्र आणणाऱ्या निष्ठा ह्यांचे स्वरूप कोणते असेल? ह्या प्रक्रियेचा शोध अजून लागायचा आहे." (पृ. ५४; कंसातील भर आमची)

असाच एक मन्वंतराचा कालखंड प्राचीन ग्रीक समाजाच्या इतिहासात येऊन गेला. अथेन्स नगर-राज्याच्या इतिहासात इसवीपूर्व पाचव्या शतकाच्या अलीकडे-पलीकडे. सॉक्रेटिसच्या जीवनाचे नाट्य या मन्वंतराच्या पार्श्वभूमीवरच घडले.

त्या काळाबद्दलही *पाश्चात्त्य नीतिशास्त्राचा इतिहास* या पुस्तकात विवेचन येते. या काळात, ज्यांना 'सोफिस्ट' म्हटले जाते त्यांनी 'सद्‌गुणाचे (virtue) स्वरूप काय', 'माणसाने सद्‌गुणी, शीलवान (virtuous) असावे हे ठीक आहे, पण म्हणजे प्रत्यक्षात कसे असावे?', 'नगरराज्याचे स्वास्थ्य कशात असते?' या प्रश्नांची उत्तरे देण्याचे काम केले. त्या काळात ग्रीसमध्ये नगर-राज्ये अस्तित्वात आलेली होती. "नगर-राज्यात यशस्वी रीतीने जगायला, सत्ता कमवायला जे कौशल्य (techne) अंगी असावे लागते ते कौशल्य म्हणजे शील (virtue) आणि हे कौशल्य आपण शिकवू शकतो असा सोफिस्टांचा दावा होता," असे रेगे यांनी म्हटलेय. त्या त्या नगर-राज्यानुसार नीती, न्याय यांचा आशय बदलता असतो, आणि आपण ज्या नगर-राज्याचे रहिवासी असू त्या नगर-राज्याचे कायदे, रूढी, परंपरा, संकेत ह्यांना अनुसरून वागावे, त्यांचा आपल्या उद्दिष्टांसाठी कौशल्याने, हिकमतीने, हुशारीने फायदा करून घ्यावा, अशी सोफिस्टांची 'नैतिक सापेक्षतावादी' भूमिका व शिकवण होती.

"समाजाची घडी आमूलाग्र बदलत असते आणि प्रचलित नैतिक संकल्पनांचा अर्थ अस्पष्ट, संदिग्ध झाल्याचे आढळून येते तेव्हा तेव्हा ह्या संकल्पनांचा खराखुरा, प्रमाण अर्थ स्पष्ट करण्यासाठी मानवाच्या 'नैसर्गिक' स्वरूपाचा, त्याच्या मूळ प्रकृतीचा आधार घेण्याचा मोह अनावर होतो. नैसर्गिक मानव संपूर्णपणे स्वार्थी, लंपट, आक्रमक असतो असे त्याचे स्वरूप सोफिस्टांनी कल्पिले आहे... नैसर्गिक मानव केवळ आपला स्वार्थ साधण्यात मग्न असतो, पण इतर मानवही स्वार्थी आणि आक्रमक आहेत ह्याचे भान जेव्हा त्याला होते तेव्हा... आपल्या स्वार्थाला मर्यादा घालणारे काही संकेत पाळणे सर्वांच्याच (आणि म्हणून आपल्याही) स्वार्थाचे आहे हे ध्यानात येते, इतरांच्याही येते. त्यापैकी कित्येक संकेत नीतिनियम म्हणून स्वीकारण्यात येतात; कित्येकांना कायद्याचे रूप देण्यात येते." स्वतःच्या वर्तनावर बंधनकारक असणारे संकेत व 'समाजाचा एक घटक' हे स्वरूप औपचारिकतः स्वीकारलेले असले तरी, "आपले नैसर्गिक स्वरूप दडविण्यासाठी त्याने पांघरलेले ते एक कवच असते. आपल्या मूळ प्रकृतीला अनुसरून आपण स्वीकारलेल्या ह्या वेगळ्या स्वरूपाचा, बंधनकारक संकेतांचा तो आपल्या स्वार्थाचे एक साधन म्हणून वापर करीत असतो." (पृ. १२-१३) न्याय म्हणजे काय? वा नीतीने वागणे कोणते? या प्रश्नाचे, 'प्रत्येकाने आपला स्वार्थ साधेल असे वागणे म्हणजे न्याय्य वागणे' असे प्रधान उत्तर सोफिस्ट देत.

रेगे म्हणतात, "सोफिस्टांच्या म्हणण्याप्रमाणे नीतिनियम म्हणजे माणसांनी स्वीकारलेले काही संकेत, आणि हे संकेत स्वीकारण्यापूर्वी माणसाचा स्वभाव, वर्तन कसे असते ह्याचे यथार्थ वर्णन 'नैसर्गिक मानव' ही संकल्पना करते. परंतु, 'स्वार्थी' हे विशेषण एखाद्याला लावताना नीतिनियम अभिप्रेत असतात हे उघड आहे. ज्या नैतिक मर्यादेत स्वतःचे हित साधण्याची मुभा प्रत्येकाला असते तिचा मुलाहिजा न बाळगणारा तो स्वार्थी. तेव्हा 'नैसर्गिक मानव' म्हणजे नीतिनियमांच्या पलीकडे (किंवा अलीकडे) असलेल्या मानवाचे नीतिनिरपेक्ष, नैतिक भेदांचे अवलंबन न करता केलेले वर्णन नव्हे." (पृ. १३) पण "माणसांचे मूळ, खरेखुरे स्थान समाजाच्या बाहेरच आहे; मानवी व्यक्तीचे अस्तित्व समाजनिरपेक्ष आहे" हे सोफिस्टांचे म्हणणे. नैतिक कसोट्यांवर माणसाचे वर्तन, कृती जोखून योग्य-अयोग्य असा निवाडा टाळावयाचा असेल तर, व्यक्ती, खरे तर, समाजनिरपेक्ष व म्हणून नीतिनिरपेक्ष असते असे म्हणणे वा त्या त्या स्थळी वा काळी फायद्याचे, स्वार्थाचे असतील ते नीतिनियम मान्य करणारी सापेक्षतावादी भूमिका घेणे सोयीचे असते. रेगे म्हणतात, "नैतिक संकल्पनांना स्वतःचा असा अर्थच नसतो; त्यांचा 'खरा' अर्थ काय, त्या वापरण्याचे योग्य निकष कोणते हे प्रश्नच उद्‌भवत नाहीत, आपल्याला त्यांना अर्थ द्यावा लागतो, आपण त्यांना देऊ तो त्यांचा अर्थ, आपण मानू ते वापराचे योग्य निकष, 'चांगले कृत्य मानले जाणे म्हणजेच चांगले कृत्य' असणे ही सोफिस्टांची विचारसरणी." (पृ. १६)



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

– ५ –

भारतातही एक मन्वंतर घडले आहे. ते गेल्या काही वर्षांमध्ये जास्त वेग घेत आहे. सोफिस्ट ज्या प्रकारच्या विचारसरणीचा पुरस्कार करीत होते वा मॅकिआव्हेलीचा जो नीतिविचार होता त्या प्रकारच्या नीतिविचारांचा वा विचारसरणीचा प्रभाव सार्वत्रिक आढळून येतो. नैतिक वर्तन कोणते, कोणती मूल्ये नैतिक, योग्य व श्रेयस्कर, सदाचरणाचा आशय कोणता या प्रश्नांची पारंपरिक उत्तरे माहीत नसतात असे नाही. अजूनही ती मध्यमवर्गीयांच्या, जनसामान्यांच्या मनात खोलवर रुजलेली आढळतात. पण समाजातील वरिष्ठ वर्गांची, राज्यकर्त्यांची वैठक ठळकपणे वदलली आहे. आजच्या आधुनिक व्यवहारी जगात यशस्वी व्हायचे असेल, भरभराट व्हायची असेल तर जुनी पारंपरिक नीती गुंडाळून ठेवून व्यक्तिवादी स्वार्थी (वरील प्रकारची) सोफिस्ट नीतीच आचरली पाहिजे, असे पुष्कळ ठामपणे सांगितले जाते. मध्यमवर्गीय व सामान्य जनांमध्येही आज ही नवी भूमिका वरचढ बनलेली आढळून येते. आपण करतो तो व्यवहार नीतीच्या आदर्शाला धरून नाही ही कबुली आज मिळते. पण 'आजच्या काळात आदर्श नीतीने काम व्हावयाचे नाही', 'कोण आदर्श नीती पाळतोय म्हणून मी पाळावी?', 'आजच्या काळात ठकास महाठक वनले तरच यश मिळणार आहे' या प्रकारची उत्तरे मिळतात. ज्या आवाजात व भाषेत हे सर्व म्हटले जाते ते असे सांगते की, एक नवी नीती प्रचलित झाली आहे व तीच व्यवहाराची, योग्य असो वा नसो, आजची व उद्याची नीती राहणार आहे, हे सांगणाऱ्याचे म्हणणे आहे.

कायद्यात न वसणारा व पकडला गेल्यास गुन्हा ठरणारा व्यवहार असतो हे मान्य होण्यात अडचण पडत नाही. म्हणजे, कायद्यात न वसणारा व्यवहार यशस्वीपणे केला गेला किंवा केला गेला नाही, असा भेद करणे ठीक ठरते. पण बेकायदेशीर व्यवहार पकडला जाऊन (एक ना एक प्रकारची) शिक्षा जरी झाली तरी आपल्या हातून अनैतिक वर्तन झाले, आपल्या हातून घोर अपराध घडला अशी प्रतिक्रिया होताना दिसत नाही. व्यवहार झाकून ठेवण्यात यश आले नाही यासाठी स्वतःच्या नशिवाला, अकर्तृत्वाला, अकार्यक्षमतेला, अपुरे पडण्याला माणसे बोल लावतात. यासाठी खंत बाळगतात. 'अमुक एक प्रकारचा आचार अनैतिक व म्हणून भ्रष्ट असतो' हे एक निरर्थक विधान ठरते. नैतिक संवेदनाशून्यतेचा वा कोडगेपणाचा वा लवाड असण्याचा येथे मुद्दा नाही. या दृष्टीने कोणत्याही आचाराकडे पाहणेच अवैध ठरविले जाते.

समाजाच्या अशा अवस्थेत दोन गोष्टी घडतात. नीती हा शब्द शब्दकोशातून वाद होतो असे नाही. त्याची व्याख्या पार वदलते. सत्ता, धन, बळ इत्यादी अंगांनी जे समाजात वलवान असतात, यशस्वी असतात, प्रभुत्व गाजवीत असतात ते जे जे काही करतात ते ते नीतीला धरूनच असते; त्यांच्या त्या त्या वेळच्या वागण्या-बोलण्यानुसार नीतीने वागणे काय हे ठरते. अशांची हुकुमत ज्यांच्यावर चालते त्यांनी अशांचे आदेश न पाळणे, घालून दिलेले नियम मोडणे, आपण स्वतंत्र व स्वायत्त आहोत असे समजून निर्णय घेणे व कृती करणे हे नीतीला सोडून वागणे ठरते.

नीती-अनीतीविषयी आणखी एक भूमिका ठामपणे मांडली जाते. जे कर्तृत्ववान, वलवान, साधनसंपत्तिवान, वुद्धिवान, प्रतिष्ठावंत, हिकमती इत्यादी असतात त्यांना नीतीची गरज नसते. किंवहुना व्यक्तिनिरपेक्ष नैतिक नियम हे त्यांच्या पायातले साखळदंड ठरतात. नीतीचे संरक्षण दुवळ्या, कर्तृत्वहीन, निर्बुद्ध सामान्यजनांना हवेसे वाटते; नैतिक नियमांच्या साखळदंडांनी ते वलवानांना, कर्तवगारांना, वुद्धिवंतांना वगैरे स्वतःसारखे दुवळे करून ठेवू इच्छितात; नीती हे त्यांचे त्यासाठीचे हत्यार असते. याच म्हणण्याचा विस्तार म्हणून पुढील मत आग्रहपूर्वक मांडले जाते. कोणत्याही समाजाचा उत्कर्ष, त्याचा साम्राज्य-विस्तार, संस्कृतीचे वैभव, त्याची आर्थिक समृद्धी इत्यादी गोष्टी समाजातील अशा अलौकिक कर्तृत्वाच्या, वुद्धीच्या, प्रमाथी शक्तीच्या, प्रतिभा असलेल्या व्यक्तींच्या वाटेत नीतिनियमांचे काटे न पसरण्यावर, अडथळे निर्माण न करण्यावर व वंधने न घालण्यावर अवलंवून असतात. त्याच वेळी हेही खरे की जे सामान्य असतात अशांचीच प्रचंड वहुसंख्या असते – त्यांना नीतिनियमांचा पांगुळगाडा हवाही असतो आणि त्यांना काबूत ठेवायला, दडपायला, शांत ठेवायला नीतिनियमांची गरजही असते.

श्री. अण्णा हजारे यांच्या भ्रष्टाचारनिर्मूलन मोहिमेला आरंभी भरपूर प्रसिद्धी मिळाली. त्यांना 'पाठिंबा'ही व्यक्त झाला. त्यांच्या मोहिमेतील हवा काढून घेण्याच्या हेतूने राज्यकर्त्यांनी 'प्रतिसाद'ही दर्शविला. पण समाजाच्या ज्या थरांमध्ये या मोहिमेने पकड घेतली तरच शासकीय यंत्रणेतील सार्वत्रिक


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अनुक्रमणिका

भ्रष्टाचार निपटून काढणे शक्यतेच्या कोटीत येईल त्या यशस्वी, भरभराटलेल्या, सत्तावान, साधनसंपत्तिवान, बुद्धिवान वरिष्ठ थरांमध्ये त्यांची भूमिका रुजली नाही. ती तशी तळागाळातल्या थरांमध्येही रुजली नाही. समाजाच्या सर्व थरांमधल्या अनेक व्यक्ती त्यांच्या मोहिमेत सहभागी झाल्या आहेत खऱ्या, पण सामूहिक वळ उत्पन्न झाले नाही.

वरील विवेचनाच्या पार्श्वभूमीवर या गोष्टीचे नवल वाटायला नको. भ्रष्टाचारांची प्रकरणे उघडकीला आणून भ्रष्टाचार निर्मूल होणार नाही अशा स्थितीत आपण पोचलो आहोत. भ्रष्टाचार सार्वत्रिक व खोलवर भिनलाय, पसरलाय म्हणून नव्हे; तर, नीति-विचाराच्या क्षेत्रातच समाजात, लोकमानसात संभ्रम, द्विधा मनःस्थिती, संशय, शंकेखोरपणा या गोष्टी उत्पन्न झाल्या आहेत.

*पाश्चात्त्य नीतिशास्त्राचा इतिहास* हे पुस्तक वाचले म्हणजे ठळकपणे लक्षात येते की, समाजात घडून आलेल्या मन्वंतरांना समांतर अशी, त्या त्या मन्वंतरातून उत्पन्न झालेल्या पेचांची, समस्यांची व आव्हानांची दखल घेत, पाश्चात्त्य जगात कसून नीतीमीमांसा होत आली व नैतिक विचारव्यूह समाजासमोर मांडले जात राहिले. अशा वैविध्यपूर्ण नीतिमीमांसांपासूनचा बोध समाजधुरीणांमध्ये, राज्यकर्त्यांच्या धोरणे-कार्यक्रमांमध्ये, सामाजिक संस्थांच्या स्वरूपात, लोकांच्या दैनंदिन व्यवहारात कसा स्वीकारला जातो याचे काही शास्त्र नाही. पण तो बोध मुरतो व अंमलात येतो ही गोष्ट खरी. पण हे काम सतत होत राहावे लागते.

*पाश्चात्त्य नीतिशास्त्राचा इतिहास* ही लेखमाला १९७४ मध्ये पुस्तकरूपात प्रसिद्ध झाली तेव्हा प्रा. रेगे यांनी पुस्तकाला जोडलेल्या प्रस्तावनेत म्हटले होते, "आज आपला समाज कुंठित, 'भ्रष्टाचारी' झाल्यासारखा दिसतो ह्याचे एक महत्त्वाचे कारण हे असणे शक्य आहे की, पारंपरिक नीतीचा आपल्या मनावरील काबू सुटला आहे आणि आधुनिक नीतीला पायाभूत असलेली मूल्ये व दंडक आपण आत्मसात केलेले नाहीत." वरील वाक्यांच्या आधी त्याच परिच्छेदात रेगेंनी लिहिले होते, "राजा राममोहन रॉय ह्यांच्यापासून आचार्य विनोबा भावे यांच्यापर्यंत जो नैतिक विचार आधुनिक भारतात झाला त्याचे उद्दिष्ट स्थूलमानाने भारतीय समाजाचे भारतीयत्व टिकवून त्याचे आधुनिक समाजात परिवर्तन करणे हे होते." (पृ. २)

इंग्रजी राजवट येथे प्रस्थापित झाल्यानंतरच्या सुमारे १७५-२०० वर्षांच्या काळात येथे नीतिविचार झाला, त्यात अनेक प्रवाह आढळून येतात, आणि या अर्थाने तो समृद्ध आहे. पण तो पुरा पडलेला नाही ही गोष्ट, १९७४ च्या तुलनेने, आज पंचवीस वर्षांनंतर, १९९९ साली फारच स्पष्ट झाली आहे.

भारतीय समाजाचे पुनरुत्थान शक्य व्हावयाचे असेल, समाज म्हणून त्याचे ऐकात्म्य व संघटन साधावयाचे असेल, आणि व्यवहार नैतिक बनावयाचा असेल, तर प्राचीन काळापासून अतूट राहिलेल्या भारतीय समाजव्यवस्था व वैचारिक परंपरा यांच्याशी जिवंतपणे नाळ जोडून घेऊन वर्तमान परिस्थितीला भिडणारी नीतिमीमांसा करण्याचे आव्हान पेलण्याशिवाय अन्य मार्ग नाही.

**वसंत पळशीकर**



*नवभारत* वर्गणीचे नवे दर

१ जानेवारी १९९९ पासून अंमलात आलेले दर ....

वार्षिक रुपये २००.००

त्रैवार्षिक रुपये ५५०.००

पंचवार्षिक रुपये ९००.००

आजीव वर्गणीची पद्धत नाही याची कृपया नोंद घ्यावी.

व्यवस्थापक, *नवभारत*, प्राज्ञपाठशाळामंडळ, गंगापुरी, वाई ४१२८०३, (जि. सातारा)

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

आपल्या ग्रंथालयात अवश्य हवीत अशी

# प्राज्ञपाठशाळा मंडळ ग्रंथमालेची

संग्राह्य वैचारिक मराठी प्रकाशने

सुधारित किंमत : १ एप्रिल १९९७ पासून लागू

| | |
|---|---|
| ■ वैदिक संस्कृतीचा विकास । (तिसरी आवृत्ती) तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी | ३०० रु. |
| ■ अद्वैतसिद्धीचे मराठी भाषांतर (पूर्वार्ध) । ब्र. स्वामी केवलानंद सरस्वती | २०० रु. |
| ■ पुरोहितवर्गवर्चस्व व भारताचा सामाजिक इतिहास । डॉ. सुमंत मुरंजन | ६० रु. |
| ■ हिंदी साहित्यविचार । प्रा. प्यारेलाल गोहेल | ५ रु. |
| ■ श्री. यशवंतराव चव्हाण अभिनंदनग्रंथ | ६० रु. |
| ■ संशोधन साधना । डॉ. वसंत स. जोशी | ४० रु. |
| ■ ज्ञानदेव चिंतन (संपादित) । डॉ. वसंत स. जोशी | ४० रु. |
| ■ तरंगयामिक व पुंजयामिक । मा.ग. टोळे | १० रु. |
| ■ आर्यांच्या सणांचा प्राचीन व अर्वाचीन इतिहास । ऋग्वेदी | ८० रु. |
| ■ वागीश्वरी । डॉ. गो.के. भट | ४० रु. |
| ■ प्रस्थानभेद (प्राचीन १४ विद्यांची माहिती) पुनर्मुद्रण । गं.वा. लेले | २५ रु. |
| ■ गिर्यारोहण परिचय । अच्युत खोडवे | १० रु. |
| ■ इतिहासाचे तत्त्वज्ञान (दुसरी आवृत्ती) । सदाशिव आठवले | ८० रु. |
| ■ दासशूद्रांची गुलामगिरी (भाग २) । शरद् पाटील | १०० रु. |
| ■ शाहीर हैवती । डॉ. शिवाजीराव चव्हाण | ४० रु. |
| ■ गीताचिकित्सा । भाऊ धर्माधिकारी | १०५ रु. |
| ■ तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी (चरित्र) । सौ. मालती देशपांडे | २५ रु. |
| ■ बौद्ध धर्माचा अभ्युदय आणि प्रसार । प.ल. वैद्य | ३० रु. |
| ■ हिंदू धार्मिक परंपरा आणि सामाजिक परिवर्तन । मे.पुं. रेगे | २५ रु. |
| ■ पाच पुस्तक-परिक्षणे । वा.म. कुलकर्णी | ४० रु. |
| ■ भेदविलोपन : एक आकलन । अशोक केळकर | २० रु. |
| ■ कॉलिंगवुडची कलामीमांसा – एक भाष्य । रा.भा. पाटणकर | ८० रु. |
| ■ न्या. महादेव गोविंद रानडे : व्यक्तित्व, विचार व कार्य | १०० रु. |
| ■ धर्मश्रद्धा : एक पुनर्विचार । दि.के. बेडेकर | १५ रु. |
| ■ आचार्य शं.द. जावडेकर : व्यक्तित्व आणि विचार | १०० रु. |
| ■ तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी, कार्य आणि विचार | १५० रु. |
| ■ इहवाद आणि सर्वधर्म समभाव । मे.पुं. रेगे | ८० रु. |
| ■ प्राज्ञपाठशाळा आणि तिची परंपरा | २०० रु. |
| ■ चार्वाक : इतिहास आणि तत्त्वज्ञान (तृतीयावृत्ती) । सदाशिव आठवले | ८० रु. |
| ■ विनोबांची संस्कृत साम्यसूत्रे (रसग्रहणात्मक मराठी अनुवाद) । वसंत नारगोलकर | १२० रु. |

*१) ग्रंथालये व संस्थांना किंमतीत १० टक्के सूट. पोस्टेजचा खर्च वेगळा पडेल. २) व्ही.पी. ची पद्धत नाही. ३) पैसे मनिऑर्डरने वा ड्राफ्टने पाठवावेत. ४) एकूण ५०० रुपयांच्या पुढे पुस्तके घेणाऱ्यास पोस्टेजचा खर्च पडणार नाही.*

*संपर्कासाठी पत्ता :* चिटणीस, प्राज्ञपाठशाळा मंडळ, ३१५ गंगापुरी, वाई ४१२ ८०३ (जि. सातारा)





राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# सानेगुरुजींचा संस्कृतीविचार

## गोविंद पुरुषोत्तम देशपांडे

– १ –

*भारतीय संस्कृती*च्या प्रस्तावनेत सानेगुरुजींनी त्यांच्या मांडणीचे वर्णन फार नेटकेपणाने केले आहे. ते म्हणतात : "भारतीय संस्कृती' ह्या शब्दांचा अर्थ काय असतो? तेथे भारतीय संस्कृतीचा इतिहास अभिप्रेत नसतो. भारतीय संस्कृतीची जी एक विशेष दृष्टी, ती तेथे अभिप्रेत असते. ही दृष्टी कोणती? भारतीय संस्कृतीची ही दृष्टी दाखविण्याचा येथे मी प्रयत्न केला आहे." थोडक्यात, संस्कृतीचे जे नानाविध अर्थ आहेत त्यांत एक अर्थ त्यांनी मूलभूत मानला आहे. प्रत्येक संस्कृतीची विशेष अशी वैश्विक दृष्टी (वेल्टआन्शाउंग किंवा वर्ल्ड व्यू) असते. ती मांडता आली की त्या संस्कृतीची व्याख्या होते. संस्कृती ह्या सर्वसाधारण शब्दाच्या व्याख्येत त्यांना रस नाही. किंवा, ती दृष्टी परिभाषित करायची म्हणून समग्र इतिहास सांगावा लागत नाही अशी त्यांची धारणा आहे. त्याचा एक अर्थ असा होईल की, ही दृष्टी नेमकेपणाने हेरणे किंवा मांडणे इतिहास समजून घेण्याच्या दृष्टीनेही उपयुक्त ठरते. ती दृष्टी समजल्या-शिवाय त्या त्या संस्कृतीचा इतिहास मांडता येणार नाही.

त्यांच्या विशिष्ट शैलीत, त्यांची मांडणी ही एका पीठाची (स्कूल ऑफ थॉटची) आहे हे सानेगुरुजींनी स्पष्ट केले आहे. ते आपले पूर्वसुरी म्हणून विनोबांचा उल्लेख करतात. किंबहुना, विनोबांकडून जे भक्तिप्रेमाने ऐकले ते 'सारांशा'ने त्यांनी लिहिले आहे असे ते म्हणतात. (*भा.सं.*, पृ. ५)

ह्याचा उल्लेख करण्याचे कारण असे की, सानेगुरुजींच्या शैलीपुढे त्यांच्या आशयाकडे दुर्लक्ष होते असे मला बरेच वेळा वाटते. आशयाकडे दुर्लक्ष होते किंवा आशयाचा अर्थ विपरीत होऊन बसतो. इथे ते दोन-तीन गोष्टी स्पष्ट करीत आहेत. १) त्यांचा प्रतिपाद्य विषय. २) कुठल्या दृष्टिकोनातून ते तो विषय मांडत आहेत. ३) त्या मांडणीचे गोत्र, प्रवर कोणते? ४) कुठल्या पीठात किंवा परंपरेत त्यांनी त्यांचे विश्लेषण केले आहे. सारांश, ॲकॅडेमिक शिस्त पाळणारे त्यांचे लेखन आहे. सानेगुरुजींच्या बाबतीत हे गुण त्यांना दिले जात नाहीत असा माझा अनुभव आहे म्हणून हे मांडले.

दुसरे असे की, ह्या लेखनात ज्ञान, कर्म आणि भक्ती यांचा मेळ घातलेला आहे. ज्ञान, भक्ती आणि कर्म या तिन्ही मार्गांत एकात्मता बघणारी त्यांची दृष्टी आहे हे ते प्रस्तावनेतच स्पष्ट करतात. "भारतीय संस्कृती म्हणजे कर्म-ज्ञान-भक्तीचा जिवंत महिमा – शरीर, बुद्धी व हृदय यांना सतत सेवेत झिजवण्याचा महिमा.' हे वाक्य महत्त्वाचे आहे. कर्म-ज्ञान-भक्ती हे (भारतीय संस्कृती) समजावून घेण्याच्या प्रक्रियेतील एकमेकांपासून वेगळे करता येणार नाहीत असे तीन भाग आहेत. भक्तीशिवाय ज्ञान शक्य नाही. एवढेच नव्हे तर ज्ञानप्रक्रिया (एपिस्टेमॉलॉजिकल प्रोसेस) ही शेवटी भक्ति-प्रक्रियाच असते. ही भूमिका पुनः विनोबांची आहे. श्री. रा. बहादूर ह्यांनी काही उपनिषदांचे इंग्रजीत भाषांतर (व त्या श्लोकांचे कवितेत रूपान्तर) केले आहे. त्याला विनोबांनी लहानशी प्रस्तावना लिहिली आहे. त्या प्रस्तावनेत विनोबा म्हणतात :

> 'Such a task (म्हणजे भाषांतराचे काम) should be viewed as an act of devotion.... The primary reward to the author of such labour is in the shape of soul-purification.'[१]
>
> (ह्या कामाकडे भक्ती म्हणून पहायला हवे. ह्या कष्टातून मिळायचे काय? तर आत्मशुद्धी. तेच ह्या कार्याचे मुख्य फलित.)

थोडक्यात, भाषांतर ही (टेक्स्ट किंवा पाठ्य) समजावून घ्यायची ज्ञानार्जनाची प्रक्रिया आहे व ती भक्तीशिवाय शक्य नाही. किंवा ती भक्तीच असते. म्हणूनच तिने आत्मशुद्धी होते असा त्यांचा अभिप्राय आहे. भारतीय संस्कृतीच्या बाबतीतही सानेगुरुजींचाही हा दृष्टिकोन आहे. ते स्वतःला त्या संस्कृतीचा उपासक मानतात याचा अर्थ तोच आहे. उपरिनिर्दिष्ट प्रस्तावनेत विनोबांनी "हा उपक्रम म्हणजे उपासना (act of worship) आहे" असेही म्हटले आहे. उपासना आणि आत्मशुद्धी ह्या दोन्ही संज्ञा विनोबांनी हेतुपुरस्सर वापरल्या आहेत. मात्र ही उपासना आंधळी उपासना नव्हे. विनोबांच्या विचार व विश्लेषण-







अनुक्रमणिका

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

पद्धतीत आंधळेपणाला जागा नाही. सानेगुरुजींचीही तीच दृष्टी दिसते. कोणतेही मत "सत्य असेल तर काळाच्या ओघात टिकेल" असे ते म्हणतात (*भा.सं.*, पृ. २१). ह्याचा अर्थ कुठलेही मत विवेकाच्या ऐरणीवर आलेच पाहिजे असा होतो. हा अर्थ त्यांनी कुठेही सोडलेला नाही. सानेगुरुजींशी (किंवा विनोबांशी) कुणाचा मतभेद झालाच तर तो त्यांच्या समग्र दृष्टिकोनाविषयी किंवा त्यांच्या अर्थवादाशी होईल, त्यांच्या मांडणीतल्या तपशीलांच्या तर्कशुद्धतेविषयी होणार नाही, किंवा झालाच तर तो त्यांच्या अर्थवादाच्या चौकटीत वसविला तर आणखी स्पष्ट होईल. हे एकदा ध्यानात घेतले की, वरकरणी भावुक वाटणारी (सानेगुरुजींची) विधाने त्यांनी लावलेल्या तर्कव्यवस्थेचा भाग दिसू लागतात. सानेगुरुजींचे विश्लेषण एक संरचना (स्ट्रक्चर) उभी करीत आहे हे विसरून उपयोगाचे नाही. म्हणूनच माझे 'स्ट्रक्चर' तर्कशुद्ध आहे असा मनूचा आग्रह किंवा श्रुतींच्या वर विवेक आहे असे शंकराचार्यांचे म्हणणे त्यांनी मुद्दाम मांडले आहे.[३] (*भा.सं.*, पृ. १८)

तिसरे असे की, सानेगुरुजींची मांडणी ही एका कादंबरीकाराची मांडणी आहे... ह्याचा अर्थ सोपा आहे. कादंबरीकार एक मोठा कॅनवास पुढ्यात घेऊन रचना करीत असतो. एक चांगली कादंबरी तिचा समकालीन समाज, त्या समाजाचे, त्या समाजातील व्यक्तींचे प्रश्न मांडीत असतो. कादंबरीत संवादाच्या निरनिराळ्या पातळ्या असतात. सानेगुरुजींच्या संस्कृतीवरच्या लेखनातही अशा पातळ्या दृष्टीस पडतात. त्यामुळे एरवी ॲकॅडेमिक शिस्त पाळणारे त्यांचे लेखन प्रसंगी कादंबरीसदृश स्वातंत्र्य घेताना दिसते. त्यांना अभिप्रेत असलेले भारतीय संस्कृतीचे अर्थ एका कादंबरीकाराचे अर्थ आहेत. त्यामुळेच वर्ण, अद्वैत, विरोध-विग्रहादि संकल्पनांचे ते लावीत असलेले अर्थ एक अनुभवाचे क्षितिजच तुमच्यापुढे मांडीत असतात. ॲकॅडेमिक लेखन विषयाचा परीघ सीमित करून घेते व स्थूलमानाने त्यांनीही तसे केलेले आहे. पण त्याचबरोबर तो परीघही कादंबरीकाराच्या परीघाप्रमाणे विस्तारत आहे किंवा संकोचत आहे हे आपल्या लक्षात येते.

कादंबरीतला संवाद कहाणी (नॅरेटिव) पुढे नेण्यासाठी किंवा प्रसंगी कहाणीचे पापुद्रे उलगडून दाखविण्यासाठी वापरलेले असतात. *श्यामची आई* मध्ये गोष्टीतले संवाद आणि गोष्ट सुरू करून द्यायचे (किंवा संपवायचे) संवाद, शिवाय गोष्टीतले गोष्टीबाहेरच्या पात्रांसाठीही अर्थ असणारे संवाद असा एक संवादांचा जाणीवपूर्वक केलेला त्रिविध प्रयोग दिसतो. *भारतीय संस्कृती*मध्ये शैलीचे रूप संवादासारखे आहे. निदान सानेगुरुजी आपल्याशी बोलत आहेत, आपला प्रश्न हेरून त्याला उत्तर देत आहेत असे त्या संवादाचे स्वरूप आहे. (महाभारतातील 'कोऽयं धर्मः कुतो धर्मः' ह्या भीष्माला केलेल्या प्रश्नाचे त्यांनी केलेले विवेचन पाहावे. [*भा.सं.*, पृ. १९] त्या विवेचनाची वीण मी काय म्हणत आहे ह्याची साक्ष द्यायला पुरेशी आहे.)

युरोपमध्ये, विशेषतः जर्मनीत उगम पावलेला शैक्षणिक कादंबरी, वर्धापनाची कादंबरी (*बिल्डुंग्जरोमान किंवा अर्झीउंग्ज-रोमान*) असा एक कादंबरीप्रकार महशूर आहे. गोएटेची *विल्हेम मायस्टर्स ॲप्रेन्टिसशिप* ही प्रसिद्ध कादंबरी घ्या. कादंबरीप्रकाराचे उदाहरण म्हणून ती नित्य उल्लेखिली जाते. *श्यामची आई* किंवा *श्याम* ह्याच वर्गात मोडतील. सानेगुरुजींच्या विश्लेषण-पद्धतीवर कादंबरीलेखनाची, विशेषतः ह्या *बिल्डुंग्जरोमान* प्रकारात मोडू शकेल अशा कादंबरीलेखनाची दाट छाया आहे. अर्थात ह्या कादंबरीविशेषाबाबतीत सानेगुरुजींच्या काळात मराठीत काहीच लिहिले गेले नव्हते. इंग्रजीतही फारसे नव्हते. त्यामुळे सानेगुरुजींनी ही शैली स्वतंत्रपणे विकसित केली होती असे म्हटले पाहिजे. संक्रमणकाळातील किंवा वर्धापन-काळातील व्यक्तीला त्याच्या संस्कृतीचे भान सानेगुरुजींचे हे पुस्तक घडवून देते. हे *भारतीय संस्कृती*च्या अनेक वैशिष्ट्यांपैकी एक मानावे लागेल. सारांश, त्यांची पद्धत निव्वळ तर्कप्रधान नाही. ती अनुभवप्रधान व संस्कारप्रधानही आहे. संस्कृतीचा विचार प्रामुख्याने अनुभवप्रधान व संस्कारप्रधानच असायला हवा असेही म्हणता येईल.

## - २ -

*भारतीय संस्कृती* ह्या शीर्षकाखाली सानेगुरुजींनी कशाचा विचार केला आहे हे पाहायचे तर एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धापासून विसाव्या शतकाच्या आरंभपर्वापर्यंत महाराष्ट्रीय संकल्पनाव्यूह (डिसकोर्स) काय होता हे ध्यानात घेतले पाहिजे. रानड्यांचा महाराष्ट्र धर्म असो किंवा फुल्यांचा सत्यधर्म असो किंवा टिळकांचे कर्मयोगरहस्य असो, चर्चा प्रामुख्याने इस्लामपूर्व कल्पनांची, विचारांची आहे हे सहजच ध्यानात येईल. प्राचीन भारतीय धर्म व संस्कृतीच्या कल्पनांना भक्तिसंप्रदायाची जोड देण्याचे काम फुल्यांनी व रानड्यांनी केले. एका प्रकारे प्राचीन भारतीय संस्कृतीचिंतनाला संस्कृतापासून प्राकृताकडे घेऊन




मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

येण्याचे काम ह्या दोघांनी केले आहे. फुल्यांच्या अखंडांचे तुकारामाच्या अभंगाशी असलेले नाते प्रसिद्धच आहे.

ह्याचा एक अर्थ असा होतो की, हा संस्कृतीविचार रूढार्थाने हिंदू नव्हे. मराठी वाचक आणि भाषक हे प्रामुख्याने हिंदू होते त्यामुळे ह्या लेखनात व विश्लेषणात हिंदू संकल्पनांची चर्चा व्हावी किंवा त्या संकल्पनांची चर्चा करता करता भारतीय संस्कृतीचे स्वरूप सिद्ध व्हावे हे अटळच होते. १९-२० व्या शतकातील संस्कृती, धर्मसुधारणा, परिवर्तन आदींचा विचार महाराष्ट्रात एका विशिष्ट संकल्पनाव्यूहात झालेला आहे. तो लक्षात घेऊन त्या विचाराचा आपण अर्थ लावला पाहिजे. हा प्राचीन भारतात मान्य आणि रूढ झालेल्या संकल्पनांच्या संदर्भात लावलेला भारतीय संस्कृतीचा आजचा अर्थ आहे. ही समकालीनता महाराष्ट्रीय समाजजीवनात जे प्रश्न व ज्या चर्चापद्धती रूढ झाल्या होत्या त्या संदर्भातच मांडणी करायचे पथ्य पाळल्याने येते.

सानेगुरुजींचा संस्कृतीविचार त्यामुळे, एका वाजूला, रानडे-भांडारकरांच्या धर्मविचाराशी नाते सांगतो तर, दुसऱ्या वाजूला, गांधी-विनोवांना अभिप्रेत असलेल्या हिंदू परंपरेच्या अर्थाशी नाते सांगतो. 'हिंसया दूयते यस्य चित्तम् स हिंदुः' अशी एक हिंदू शब्दाची व्युत्पत्ती विनोवांनी मांडली आहे. विनोवांचे हे निरुक्त वहुधा शास्त्राला धरून नसावे. पण ह्या निरुक्ताचे उद्दिष्ट हिंदू परंपरेचा हिंद्वीतरांना भावेल असा अर्थ लावण्याचे होते हे उघड आहे.

ह्या संस्कृतीविचाराला त्यामुळे स्वेतराचे (the other) भान आहे. भारतीय संस्कृती ही स्वेतरप्रवण आहे, तिचे दरवाजे वंद नाहीत हे गुरुजींचे संस्कृतीविश्लेषणाचे मुख्य सूत्र आहे. 'स्वेतर' व 'स्व' ह्यातला अन्योन्यसंवंध अशी त्यांची भूमिका नाही. म्हणजे संस्कृतीत 'स्वेतर' ही संकल्पना हेगेलिअन अर्थाने वसत नाही असा त्यांचा रोख आहे. किंवहुना "प्राचीन काळात सहज ओझरती नजर फेकली, तरी विचारांची प्रचंड चळवळ दिसून येईल. यास्काचार्यांच्या नुसत्या निरुक्तात पाहिले तर.... निरनिराळ्या दृष्टींच्या शेकडो मंडळांची नावे त्यात आली आहेत. इतिनैरुक्तिकाः, इति आख्यायिकाः, इति ऐतिहासिकाः अशी निरनिराळी अभ्यासमंडळे यास्क देत आहेत.... शेकडो मते, शेकडो पंथ, शेकडो सूक्ष्म छटांचे तत्त्वज्ञानी आपणास दिसून येतात." (*भा.सं.*, पृ. १९) ह्याचा अर्थ भिन्न वैश्विक दृष्टिकोनांचे सहजीवन हे ह्या संस्कृतीचे स्वरूप आहे. दृष्टिकोन भिन्न आहेत पण संघर्षशील नाहीत असा त्यांचा आग्रह आहे. थोडक्यात, ह्या संस्कृतीत 'स्वेतर'ला द्वंद्वात्मक अशी जागा नाही असा त्याचा अर्थ होतो. द्वंद्वात्मक 'स्वेतर' असण्याचा अर्थ असा की, संघर्ष वाढतो. तसा तो यूरोपात वाढलाही. इथे वाढला नाही. ह्या संस्कृतीची समावेशकता 'स्वेतर' ही कल्पना हेगेलिअन अर्थाने नाकारण्यातून आली आहे.

दुसरे अर्थविधान महत्त्वाचे आहे. भक्तिसंप्रदायाचा हा परिणाम असावा. सानेगुरुजी संस्कृतीची व्याख्या कर्मकाण्ड नाकारणारी अशी करीत आहेत. हा धर्म कसा निर्माण झाला? तर 'मतिभिरुद्धृतम्' असे महाभारतीय उत्तर ते त्याला देत आहेत. वेदांचे रूप त्यांच्या लेखी त्यामुळे 'विचारधर्म' असे आहे. किंवहुना शव्दप्रामाण्याचे त्यांनी मांडलेले रूप लक्षणीय आहे. भारतीय दार्शनिक परंपरेत मान्यता पावलेल्या नऊ प्रमाणांत शव्दप्रामाण्य एक आहे. ते सर्वस्वी नाकारणे सानेगुरुजींना शक्य नव्हते. त्यामुळे, तार्किक प्रमाणाचे अंधश्रद्धेत रूपांतर झाले की शव्दप्रामाण्याचे वावावाक्यात रूपांतर होते, ते इथल्या चिंतनपरंपरेस अभिप्रेत नाही अशी मांडणी त्यांनी केली आहे.

अशा रीतीने ही चिंतनपरंपरा यूरपच्या परंपरेपासून त्यांनी वेगळी केली. महाराष्ट्रातील सुधारकांनी भारतीय व पाश्चात्त्य अशा दोन चिंतनपरंपरा कल्पिल्या होत्या असे वाटत नाही. १९व्या शतकात आधुनिकता आणि विचारांची वैश्विकता (युनिवर्सॅलिझम) ह्यांचा प्रभाव होता. तो सानेगुरुजींना त्या परिभाषेत मान्य होता असे दिसत नाही. वैश्विकता शक्य आहे, पण वैश्विकता आजचा युगधर्म आहे म्हणून नव्हे, तर भारतीय संस्कृतीत अशी वैश्विकता सहजच वसते म्हणून. वैश्विकता ही समावेशकतेचे रूप होऊन येते. ह्या समावेशकतेचे एक हृद्य उदाहरण देतो : वर्णाची चर्चा करताना सानेगुरुजी एक दृष्टान्त देतात :

> "वीजच नसेल तर कितीही पाणी ओतले म्हणून का अंकुर वर येणार आहे?" (*भा.सं.* पृ. ३७)

आता हा दृष्टान्त बौद्धांचा आहे. *अभिसमयालंकार* ह्या बौद्ध ग्रंथात *वर्षत्यपि हि पर्जन्ये नैवाबीजं प्ररोहति*[३] अशी ओळ आहे. 'कितीही पाणी ओतले' ह्या जागी 'कितीही पाऊस पडला तरी' असे शब्द आहेत. पण आशय तोच आहे व तो दृष्टान्तही माणसाच्या घडणीशीच जोडला आहे. नेमके हेच सानेगुरुजी करताना दिसतात. 'वर्ण' समजावून सांगताना



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

*अभिसमयालंकारा*तला दृष्टान्त वापरायचा ह्यासारखे समावेशकत्व (अर्थात काहींच्या मते हे अनौचित्याचे उदाहरण ठरेल!) दुसरे दाखविता येणे कठीण. पण त्यामुळेच सानेगुरुजींचा संस्कृतीविचार 'भारतीय' ठरतो. निव्वळ 'हिंदू' ठरत नाही. तो अभिजातही (क्लासिकल) नाही. तो गांधीवादी आणि म्हणून आधुनिक मानावा लागतो.

ह्या संस्कृतीविचाराचे आणखी एक वैशिष्ट्य इथे नोंदविले पाहिजे. हा प्रयत्न पाश्चात्त्यांना भारतीय विद्या-अविद्येचे प्रकरण समजावून सांगायचे म्हणून मांडलेला विचार नव्हे. राजवाडे ज्याप्रमाणे त्यांच्या दृष्टीला पडलेली व त्यांना रास्त वाटलेली महाराष्ट्रधर्माची लक्षणे महाराष्ट्रीयांना समजावून सांगत होते त्याचप्रमाणे सानेगुरुजी त्यांच्या दृष्टीला पडलेली व त्यांना रास्त वाटलेली भारतीय संस्कृतीची वैशिष्ट्ये महाराष्ट्रीयांना समजावून सांगत आहेत.

थोडक्यात, संस्कृतीविचार (गांधीवादी) स्वदेशीपासून वेगळा करता येत नाही. किंबहुना स्वदेशीची कल्पना ही संस्कृतीसंवर्धनाची, सौंदर्यनिर्मितीची आहे ह्याचे सानेगुरुजींना भान आहे. त्यामुळे त्यांनी 'वेणुधर' कृष्णाची तरफदारी केली आहे. "जीवनात संगीत पाहिजे असेल तर ह्या वेणुधराला वाढवा" (*भा.सं.*, पृ. २३३) असे ते म्हणतात. देवकल्पना आणि कला ह्यांचा मेळ घालणे पुनः महाराष्ट्रीय परंपरेत बसणारे आहे. गणपतीची सुखकर्ता, दुःखहर्ता अशी (इतर कुठल्याही देवासारखी) ख्याती होण्याआधी मुक्तेश्वराने गणपतीच्या कलावंतस्वरूपावर भर दिला होता. त्याने लिहिलेल्या गणपतीच्या आरतीत

*सारीगमपधनि सगरि सप्तस्वरभेदा*
*धिमि धिमि धिमकिट मृदंग वाजती गतिछंदा।*
*ताथै ताथै त् तै करिसी आनंदा*
*ब्रह्मादिक अवलोकिती तव पदारविंदा।।*

असे गणपतीचे कलावंत म्हणून वर्णन केले आहे. सानेगुरुजी वेणुधराचे नेमके असेच वर्णन करीत आहेत हे लक्षात घेतले पाहिजे.

त्यामुळे, आनंद कुमारस्वामी म्हणतात त्याप्रमाणे, स्वदेशीचा विचार "religious artistic ideal" असा व्हायला हवा.[४] तसा विचार सानेगुरुजी करतात. फक्त तो स्वदेशीपुरता सीमित न ठेवता संस्कृतीएवढा व्यापक करतात. संस्कृती एका प्रकारे religious-artistic ideal होऊन बसते. पुनः ते Ideal नसते. कुमारस्वामींच्या लेखीही नाही. भारतीय सर्जनशील कलावंत ते Ideal गाठण्याच्या नित्य प्रयत्नात असतो. त्यांची (कुमारस्वामींची) स्वदेशीच्या चळवळीविरुद्ध तीच तक्रार आहे. सध्याच्या स्वदेशीचळवळीच्या पाठीशी कसलेही गंभीर व नित्य उद्दिष्ट (serious and consistent ideal) नाही असे ते म्हणतात.[५] अशा नित्य उद्दिष्टाची, ध्येयाची चर्चा गुरुजींनी केली आहे. त्यामुळे त्यांच्या लेखी श्रीकृष्णाची मुरली "ध्येया"चे प्रतीक ठरते. त्याचप्रमाणे गांधीजींनी त्यांच्या ध्येयाविषयी बोलताना "माझ्या हृदयात तम्बोरा लागलाच आहे" असे म्हटले होते ह्याचाही उल्लेख ते करतात (*भा.सं.*, पृ. २३२). सानेगुरुजींनी भारतीय संस्कृतीतील एकूणच प्रतीकांचा विचार संस्कृतीचे चिन्हशास्त्र (सेमिऑटिक्स) म्हणून केला आहे. ह्याचे कारण "प्रतीकात अनंत अर्थ साठविलेला असतो.... प्रतीके म्हणजे संस्कृतीची सूत्रे", प्रतीके म्हणजे "मनाला फुटलेले कोंब." सारांश संस्कृतीतील अमृततत्त्व सांगणारी ही प्रतीके असतात.

त्याचबरोबर 'प्रतीके' कालसापेक्ष असतात. संस्कृतीविचार कालनिरपेक्ष होऊ शकत नाही. तसा तो झाला म्हणजे प्रतीके फेकून देणारा विद्रोह निर्माण होतो व तो व्हायला हवा. मूलतत्त्ववाद (फंडामेंटलिझम) कालनिरपेक्ष असतो. तो धर्मास 'यंत्रमय' करून टाकतो असा ह्या विवेचनाचा रोख आहे (*भा.सं.*, पृ. २१४). सानेगुरुजींच्या १९३७ च्या पुस्तकात मूलतत्त्ववादाचा संकल्पना म्हणून उल्लेख नाही ह्याचे कारण वेगळे देण्याचे कारण नाही, पण त्यांच्या विवेचनातून आजच्या मूलतत्त्ववादाचा एक प्रतिवाद (क्रिटिक) निर्माण होतो ह्यात शंका नाही. व तेच त्यांच्या प्रतीकचर्चेचे आजच्या संदर्भातले महत्त्व आहे.

– ३ –

सानेगुरुजींच्या धर्मविचाराबाबत आणखी थोडा विचार केला पाहिजे. धर्माचे आधिदैविक (theological), आध्यात्मिक आणि भौतिक असे तीन विषयविभाग कल्पिता येतात. पैकी आधिदैविकाच्या चर्चेत सानेगुरुजी फारसे पडलेले नाहीत. रामाची, कृष्णाची आणि विठ्ठलाची चर्चा आहे खरी, पण ती चर्चा आधिदैविकाच्या अंगाने केलेली नाही. ती प्रामुख्याने भारतीय व महाराष्ट्रीय समाजजीवनाच्या अंगाने केलेली आहे. त्यांनी रामाला अनार्यांच्या वतीने आर्यांविरुद्ध लढणारा ठरविले






अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

आहे. "रामकथा म्हणजे साम्राज्यनाशार्थ संघटन" असा त्यांनी समर्थ रामदासांच्या कार्याचा अर्थ लावला आहे (*भा.सं.*, पृ. १८६). त्याचबरोवर "हिंदू हा भारतीय संस्कृतीचा शब्द नाही. भारतावाहेरच्या लोकांनी आम्हांस हिंदू करून डबक्यात, एका खोलीत वसविले आणि आम्ही त्या डबक्यात आनंद मानू लागलो" (*भा.सं.*, पृ. १८७) असेही त्यांनी आग्रहपूर्वक सांगितले. १९३७ च्या महाराष्ट्रात विशेषतः उच्चवर्णीयांपुढे असे काही मांडणे सोपे नव्हते.

अवतारकल्पनेचे सानेगुरुजींनी पार निर्धर्मीकरण करून टाकले. आधिदैविकात त्यांना रस नव्हता हे तर खरेच, पण त्याहीपेक्षा आधिदैविकाशी संवंधित संकल्पनांना धर्मनिरपेक्ष करून त्यांचे आधुनिकीकरण करण्याकडे त्यांचा कल होता. "अवतारी पुरुष जनतेच्या प्रयत्नांना विशिष्ट दिशेने वळण देतो. जनतेचीच शक्ती, परंतु ती केंद्रीभूत व सुसंघटित नसल्यामुळे कार्यरत होत नव्हती. परंतु त्या शक्तीला व्यवस्थित स्वरूप देताच ती अमोघ होते; तेजस्वी, अप्रतिहत होते. सर्व संकटांचा ती चुरा केल्याशिवाय राहात नाही." (*भा.सं.*, पृ. २००) थोडक्यात, "चळवळीतून महापुरुष प्रकट होतो." किंवा "महापुरुष म्हणजे विराट जनता" (*भा.सं.*, पृ. २०१, २०३) ही अवताराची मांडणी अभिनव म्हटली पाहिजे. सानेगुरुजींची ही अवताराची व्याख्या मग गांधी, लेनिन, माओ, फुले, हु चमिन्ह कुणालाही लावता येईल. भारतीय संस्कृतीचा वैश्विक पैस ते अशा निर्धर्मीकरणातून मांडताना दिसतात.

हे त्यांना शक्य झाले ह्याचे कारण त्यांनी धर्माचा आधिदैविक भाग नाकारला, किमानपक्षी टाळला, हे होय. ही भूमिका धर्माच्या आधिदैविक भागाविषयीच्या उदासीनतेतून जन्माला येते. एक प्रकारे असेही म्हणता येईल की, धर्मविचाराला सामाजिकतेची जोड देऊन संस्कृतीची व्याख्या करण्यापेक्षासुद्धा संस्कृतीविचारच पुढे नेण्याचा, त्याला पुरोगामी करण्याचा हा प्रयत्न आहे. आचार्य भागवतांच्या भाषेत बोलायचे तर "श्रद्धेला विवेकाने तपासून घेतल्याशिवाय जीवनातील जडता नाहीशी होणार नाही. श्रद्धा आणि विवेक यांच्या आधारानेच जीवनाची यात्रा सफल होऊ शकेल."[६] महाराष्ट्रीय गांधीवादी चिंतनाची ही प्रमुख खूण मानता येईल. विनोवा, आचार्य भागवत आणि सानेगुरुजी ह्या त्रयीने गांधीवादी श्रद्धेचे विवेकशील पुनर्निर्माण केले. सानेगुरुजींचा संस्कृतीविचार हे ध्यानात घेतल्याशिवाय पूर्णांशाने कळणार नाही. आपण वर पाहिले ते निर्धर्मीकरण ह्या विवेकशीलतेचा भाग आहे. त्यामुळेच ह्या त्रिकुटाच्या विचारात आधिदैविकाला फारशी जागा नाही असे दिसते. सानेगुरुजींचा संस्कृतीविचार त्यामुळे आधिदैवकापासून मुक्त आहे.

तसे आध्यात्मिकाबावत म्हणता येत नाही. किंवहुना सानेगुरुजींच्या एकुणच धर्मविचारात व संस्कृतीच्या परिभाषेत आध्यात्मिकावर भर आहे. ह्याचे एक कारण सर्वधर्मसमभावाची मांडणी त्याशिवाय करता येत नाही. आनंद कुमारस्वामींनी प्रज्ञेचा (wisdom) आणि अर्थातच प्रज्ञावंताचा हेतू किंवा उद्दिष्ट खालील शब्दांत मांडले आहे :

> So that if we are to consider the most urgent practical problem to be resolved by the philosopher, we can only answer that this is to be recognised in a control and revision of the principles of comparative religion, the true end of which science should be to demonstrate the metaphysical basis of all religions and that diverse cultures are fundamentally related to one another as being dialects of a common spiritual and intellectual language.... [७]. [तत्त्वज्ञापुढील निकडीचा, महत्त्वाचा असा कार्यवाहीशी निगडित (प्रॅक्टिकल) असा प्रश्न कोणता असे विचारले तर तौलनिक धर्मविचाराचे नियमन व परिशोध करणे हे त्याचे उत्तर आहे असे म्हणावे लागेल. तौलनिक धर्मविचार ह्या शास्त्राचे प्रमुख उद्दिष्ट सर्व धर्मांचा पाया अध्यात्म असते हे सिद्ध करणे हे असते किंवा असायला हवे. त्याचवरोवर विभिन्न संस्कृतीही आध्यात्मिक आणि बौद्धिक (इण्टलेक्च्युअल) परंपरेच्या एकाच भाषेच्या (विभिन्न) बोली असतात, हेही (तौलनिक धर्मविचाराने) सिद्ध करायला हवे.]

विनोबांनी कुराणसार लिहिले किंवा सानेगुरुजींनी इस्लामी संस्कृतीवर लिहिले त्याच्यापाठीमागची समज काय, असे विचारले तर कुमारस्वामींचा हा परिच्छेद ती समज व्यवस्थित मांडतो असे म्हणता येईल. पश्चिमेकडील तुलनात्मक धर्मविचारात एकेश्वरवाद आणि अनेकेश्वरवाद (मोनोथीजम् आणि पॉलिथीजम्) यांचे फार महत्त्व आहे. पण भारतीय संस्कृतीचा काही अंदाज यायचा तर ह्या कोटी (कॅटेगरीज) नाकाराव्या

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

लागतील हे उघड आहे. त्यामुळे सानेगुरुजींनी "principles of comparative religion" नाकारून नव्या विश्लेषण-कोटी निर्माण केल्या आहेत.

> "व्यक्तीपूजेपासून आपण आरंभ करतो व तत्त्वपूजेत त्या आरंभाचे पर्यवसान होते. मूर्तापासून निघून आपण अमूर्ताकडे जात असतो."
>
> "मानवी विकासाला मूर्तिपूजेइतकी मूर्तिभंजकता आवश्यक आहे." (*भा.सं.*, पृ. २०६)

सारांश एकेश्वरवाद, अनेकेश्वरवाद किंवा सगुण, निर्गुण परस्परविरुद्ध कोटी नसून त्या माणसाच्या आध्यात्मिक प्रवासाचा भाग आहेत. त्यातही त्यात हा प्रवास एका दिशेने होणारा प्रवास नाही. सगुण,ते निर्गुण, किंवा अनेकेश्वरवाद ते एकेश्वरवाद किंवा मूर्तिपूजा ते मूर्तिभंजकता असे ते एका दिशेने जाणारे प्रवास मानण्याचे कारण नाही. व तसे त्यांना काही अभिप्रेतही नाही.

अध्यात्माचा विचार करताना त्यांनी भौतिकाचा म्हणजे प्राचीन भारतात निर्माण झालेल्या समाजाच्या संस्थात्मक रचनेचा मूलगामी असा विचार केला आहे. त्यासंबंधी एकदोन मुद्दे लक्षात घेण्याजोगे आहेत. वर्ण आणि आश्रम ह्या संस्था ह्या विचाराच्या केंद्रस्थानी आहेत. प्रत्येक आश्रमाचा धर्म व धर्मार्थ भिन्न कसा व का आहे हे त्यांनी मांडले आहे. एकापरीने माणसाच्या विकासाच्या अवस्थेप्रमाणे त्याचा धर्म वदलला पाहिजे असा त्याचा अर्थ होतो. १८९७ मध्ये मॅक्सम्यूलरने अद्वैत वेदांतावर तीन व्याख्याने दिली होती. त्यांपैकी पहिल्या व्याख्यानात आश्रमांवर तो म्हणतो :

> It was recognised in India from early times that the religion of a man cannot be and ought not to be the same as that of a child; and again, that with the growth of the mind, the religious ideas of an old man must differ from those of an active man of the world.[८] [लहान मुलाचा आणि प्रौढ माणसाचा धर्म एक असणे शक्य नाही, इष्टही नाही हे भारतात फार प्राचीन काळापासून मान्य झालेले (तत्त्व) आहे. त्याचप्रमाणे मनो विकास घडून आल्यामुळे वृद्धाच्या धर्मकल्पना ह्या लौकिक जगात कार्यरत असलेल्या माणसाच्या धर्मकल्पनां-पेक्षा भिन्न असतात हेही मान्य झालेले (तत्त्व) आहे.]

मात्र सानेगुरुजी एवढेच म्हणत नाहीत. एका अवस्थेतून दुसरी अवस्था निर्माण होते त्याप्रमाणे एका आश्रमातून दुसरा आश्रम (म्हणजे उदाहरणार्थ) "उत्कृष्ट ब्रह्मचर्यामधूनच उत्कृष्ट गृहस्थाश्रम" सिद्ध होत असतो. (*भा.सं.*, पृ. १२८) म्हणजे मॅक्सम्यूलरची अवस्थांची कल्पना तर त्यांच्या लेखनातून सिद्ध होतेच पण त्यांचे अन्योन्यत्वही ते मांडतात. थोडक्यात, हे चारी आश्रम एकमेकांत गुंफलेले आहेत असा त्यांचा आग्रह आहे. तिथेही विवेकाचे मध्यवर्तित्व ते आवर्जून मांडतातच. आश्रम "प्रत्येकाच्या विवेकातून जन्माला यायचे आहेत." (*भा.सं.*, पृ. १३५) म्हणजे हा प्रवास सहजी, आपोआप घडणारा नाही. विकासक्रमाच्या अवस्था विवेकनिष्ठेतून जन्माला यायला हव्यात. त्या तशा सध्याला दृष्टीस पडत नाहीत. वानप्रस्थ आणि संन्यासाचा अर्थ लावताना ते म्हणतात :

> "शेकडो प्रसारक पाहिजे आहेत. शेकडो संघटना करणारे पाहिजेत. औद्योगिक, आरोग्यविषयक, धार्मिक, आर्थिक, शैक्षणिक सर्व प्रकारचे ज्ञान देणारे हजारो व्रती लोक पाहिजे आहेत." (*भा.सं.*, पृ. १३५)

म्हणजे त्यांची वानप्रस्थाची, संन्यासाची कल्पना काडर-सारखी आहे. किंवा जावडेकर म्हणत असत तशा सार्वजनिक यतीधर्माची आहे. हा विचार भौतिकाचा तर आहेच पण त्या भौतिकात वदल कसा होतो किंवा होईल ह्याचा आहे.

सानेगुरुजींच्या संस्कृतीविचारात पारंपरिक संकल्पना पार बदलून वापरल्या गेल्या आहेत असे दृष्टीस पडते. वर्ण, वेद, आश्रम आदी संकल्पनांची त्यांनी जी मांडणी केलेली आहे ती कुठल्याही शास्त्रार्थात बसणारी नाही. हे 'सववर्जन" आहे व ते नाना प्रकारे केलेले दिसते. उपरिनिर्दिष्ट व्याख्यानात मॅक्सम्यूलरने म्हटले आहे :

> ..... their (उपनिषदांचे) fundamental principle might seem with us to be subversive of all religion.[९] [सर्व धर्मविचार (एकापरीने) डोक्यावर उभा करणे (सववर्ट करणे) हे उपनिषदांचे मूलतत्त्व दिसते.]

अशा प्रकारचे "सववर्जन" नवीन नाही. पण आधुनिक काळात महाराष्ट्रीय गांधीवादात हा प्रयत्न जाणीवपूर्वक केलेला दिसतो. "वेदा"चे उदाहरण ह्या संदर्भात ठळक आहे. आचार्य भागवत भारतीय इतिहासातील प्रमुख संघर्ष वैदिक विरुद्ध अवैदिक असा आहे असे मांडताना दिसतात. माझ्या माहितीत

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

तरी अशी मांडणी करणारे ते पहिले विचारवंत असावेत. हे द्वंद्व ते मांडतात आणि अवैदिकांच्या बाजूने ते उभे राहतात असे दिसते. नागपूरला महानुभावी महंतास आ. भागवतांनी सांगितले की, "तुम्ही अवैदिक आहात ह्याबद्दल मी तुमचे अभिनंदन करतो." पुढे तर भागवत म्हणतात की, त्यांच्या दृष्टीने "श्रीकृष्ण हा स्वतःच वैदिक नव्हे."[१०] ह्या पार्श्वभूमीवर सानेगुरुजींच्या वेदावरच्या भाष्याचा विचार करायला हवा. सानेगुरुजी म्हणतात : "वेद अपौरुषेय आहेत वगैरे सर्व कल्पना भ्रामक आहेत. मानवी बुद्धीचा हा सारा पसारा आहे. वेदाला मानणे म्हणजे बुद्धीला मानणे." (*भा.सं.*, पृ. १८) आचार्य भागवत अवैदिक असण्याचा गौरव करतात तर सानेगुरुजी वेदांचे अपौरुषेयत्त्व नाकारून वेदांचे प्रामाण्य नाकारतात. शिवाय वेदांचे प्रामाण्य म्हणजे बुद्धीचे प्रामाण्य ह्यापलीकडे दुसरे काही नाही असे म्हटले की वेद नाकारणे हा त्याचा अर्थ होतो. *भारतीय संस्कृती*चा हा क्रांतिकारी असा अर्थवाद आहे हे ध्यानात घेतले पाहिजे. ह्याचे एक कारण हे युगच क्रांतीचे आहे व तसे सानेगुरुजींनी म्हटलेले आहे (*भा.सं.*, पृ. २५). पण हा शास्त्रार्थ नव्हे. वैदिक तर ह्याला पाखंडच म्हणतील. धर्मविचाराचे हे वळण सानेगुरुजींची सर्वात महत्त्वाची आणि क्रांतिकारी अशी समज होती हे ध्यानात ठेवले पाहिजे.

ह्यावरून पुढचा प्रश्न निर्माण होतो. संस्कृतीची अर्थनिश्चिती करताना संकल्पना बदलतात म्हणजे काय होते हे समजावून घेतले पाहिजे. सानेगुरुजींची व पर्यायाने महाराष्ट्रीय गांधीवादाची भूमिका या क्षेत्रातील इतर भूमिकांपेक्षा निराळी आहे. इतिहाससिद्ध संकल्पना टाकून देता येत नाहीत किंवा त्या संकल्पनांचा सरळसोट विरोधही करता येत नाही. त्या 'सबवर्ट' कराव्या लागतात, त्यांचे अर्थ बदलावे लागतात. व ते करता येते ही ती भूमिका आहे. भारतीय संस्कृतीचे तेच वैशिष्ट्य आहे असे आ. भागवत म्हणाले असते. त्यांचे शब्द वापरायचे तर "जीवनाचा धर्म शोधला जात आहे आणि जीवनाचे तत्त्वज्ञान बनत आहे"[११] ही भारतीय संस्कृतीची कल्पना आहे. मूलतत्त्ववाद त्यामुळेच त्यात बसत नाही. त्याचबरोबर आर्थिक पाया वरच्या इमल्याचे स्वरूप ठरवतो ही मार्क्सवादी कल्पना ह्या संस्कृती-विचारात बसत नाही. त्यामुळे एवढा भौतिकाचा विचार करूनही संस्कृतीविचारातील गतिमानतेचे, अशाश्वताचे तत्त्व मान्य करुनही (*भा.सं.*, पृ. २६) हा संस्कृतीविचार विशुद्ध चैतन्यवादाच्या (Absolute Idealism) व्याख्येतच मोडतो असे म्हणता येईल. अर्थात ह्या परिभाषेत त्याचे वर्णन करणे आवश्यक आहे का, असा प्रश्न कुणीही विचारेल. त्याचे उत्तर देणे सोपे नाही. पण त्याचा उल्लेख का केला हे पुढे स्पष्ट होईल. आचार्य भागवतांनी मांडलेल्या द्वंद्वाच्या परिभाषेत हा संस्कृती-विचार अवैदिक वळणाचा आहे. अवैदिक विचार आणि ॲब्सोल्यूट आयडिॲलिझम ह्यांचा संबंध काय? तर त्याला एक तात्पुरते उत्तर असे की, ज्या न्यायाने पाश्चात्त्य तौलनिक धर्मविचाराच्या विश्लेषणकोटी ह्या समाजात अपुऱ्या पडतात त्याच न्यायाने Idealism विरूद्ध materialism हे द्वंद्व अपुरे पडते. वैदिक विरुद्ध अवैदिक हे द्वंद्व महत्त्वाचे (primary) मानले पाहिजे, ही महाराष्ट्रीय गांधीवादाची भूमिका आहे.

– ४ –

सानेगुरुजींच्या संस्कृतीविचाराचा हा परामर्ष त्यांनी ज्या प्रकारे गैर-गांधीवादी किंवा गांधीपूर्व विचाराची कमीअधिक मांडणी केली आहे त्याचा उल्लेख केल्याशिवाय पूर्ण होणार नाही. १९ व्या शतकापासून जे धर्मसुधारणांचे अभियान महाराष्ट्रात सुरू झाले त्याची फारशी दखल सानेगुरुजी *भारतीय संस्कृती*त घेताना दिसत नाहीत. *भारतीय संस्कृती*त एकाच सुधारकाचा उल्लेख येतो. तो उल्लेख लोकहितवादींचा आहे. मूर्तिपूजेच्या व देवाच्या अभिषेकाची चर्चा करताना सानेगुरुजी म्हणतात, "लोकहितवादींनी आपल्या एका पत्रात एके ठिकाणी लिहिले आहे की, हा सारा बावळटपणा आहे. परंतु हा बावळटपणा नाही. ही कृतज्ञतेची खूण आहे." (*भा.सं.*, पृ. २११) हा मतभेद अर्थपूर्ण आहे. मिल, स्पेन्सर आदींनी मांडलेल्या (पाश्चात्त्य) उदारमतवादाच्या प्रभावाखाली भारतीय परंपरेचा जो प्रतिवाद (क्रिटिक) निर्माण झाला त्यात महाराष्ट्रीय गांधीवादाने फारसा रस घेतला नाही. त्या एकूणच चर्चेकडे सानेगुरुजींनी दुर्लक्ष केलेले दिसते. आणि तरीही रामशास्त्र्यांची साक्ष काढून "स्मृती ह्या पुरुषांनी लिहिल्या. त्यांनी पुरुषांची सुखसोय पाहिली. स्त्रियांच्या सुखदुःखाची त्यांना काय कल्पना?" असे ते म्हणतात. १९३७ त लिंगजाणीव (जेंडर कॉन्शसनेस) व्यक्त करणारा विचार आपल्या काळाच्या फार पुढे गेलेला दिसतो. फुले आणि केतकर हे त्यांचे ह्या बाबतीतले पूर्वसुरी ठरतात. प्रबोधनकाळातला विचार आगरकर-लोकहितवादी इत्यादी जमेस धरून असा मूलगामी शोध करणारा वाटत नाही. त्यामुळेच सानेगुरुजींना त्या विचाराचा आणि विचारवंतांचा


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

मोह पडला नसावा. आचार्य भागवतांनी चिपळूणकर, टिळक आणि आगरकर ह्यांना एका गटात घातले आहे व त्यांच्या "स्वार्थत्यागी जहाल राजकारणा"चा गौरव केला आहे हे इथे ध्यानात ठेवण्याजोगे आहे. ह्या सर्व सुधारकांचा (आणि काही सुधारकेतरांचा) परंपरेचा तोकडा आणि तोडून टाकणारा विचार महाराष्ट्रीय गांधीवादात बसणारा नव्हता. त्याचमुळे सानेगुरुजींनी राजवाड्यांचे नाव न घेता 'संत हे टाळकुटे नव्हते' असा मुद्दाम उल्लेख केला आहे. सानेगुरुजी राजवाड्यांच्या पहिल्या चरित्रकारांपैकी होते; किंबहुना त्यांनी लिहिलेले चरित्र राजवाड्यांचे पहिलेच चरित्र असावे. हे लक्षात घेतले की, ह्या निश्चित भूमिकेचा उच्चार करताना राजवाड्यांचा नामोल्लेख ह्या विशिष्ट जागी त्यांनी का टाळला असावा हे लक्षात येते. एकूणच इतिहासाकडे पाहण्याची त्यांची दृष्टी राजवाड्यांपेक्षा या संदर्भात व्यापक आहे आणि हेगेलीय *झाईटगाइस्ट*मध्ये (राजवाड्यांच्या भाषेत 'आत्मिका'त) अडकून पडलेली नाही.

*भारतीय संस्कृती* हे पुस्तक १९३७ त प्रसिद्ध झाले. हे प्रकाशनवर्ष सानेगुरुजींची हिंदुत्वविचारासंबंधी भूमिका समजावून घेण्याच्या दृष्टीने महत्त्वाचे आहे. त्याच्याकडे वळण्यापूर्वी हिंदु राष्ट्रवाद्यांना फासिस्टांचे कौतुक करणारे, हिटलरभक्त म्हणण्यापर्यंत परखडपणा सानेगुरुजींनी दाखविला आहे. हा परखडपणा महाराष्ट्रीय गांधीवादाचा भाग आहे. हिंदुत्ववाद्यांवर (पर्यायाने) भाष्य करताना आ. भागवत म्हणतात : "आपण म्हणतो की, मुसलमानांनी हिंदू व्हावे. किती मूर्खपणाचे नि निर्बुद्धपणाचे विधान आहे!"[१२] जवळजवळ अशीच सानेगुरुजींची धारणा आहे; फक्त त्यांनी ती एवढ्या स्पष्ट शब्दांत मांडलेली नाही इतकेच. पण गोळवलकर-सावरकर प्रणीत हिंदुत्वविचार त्यांना मान्य नाही एवढे निश्चित दिसते.

त्यामुळेच १९३७ सालातले हे लेखन महत्त्वाचे ठरते. १९३८ त गोळवलकरांनी त्यांचे *Our Nationhood Defined* हे पुस्तक प्रसिद्ध केले. ते पुस्तक बाबाराव सावरकरांच्या *राष्ट्रमीमांसा* ह्या पुस्तकावर बेतलेले आहे. वाङ्मयचौर्य वाटावे इतके *राष्ट्रमीमांसा* ह्या पुस्तकाचे ऋण गोळवलकरांच्या पुस्तकात दिसते. सारांश, भारतीय आणि हिंदू संस्कृतीचा काहीएक अर्थ महाराष्ट्रात तिशीच्या उत्तरार्धात रूढ झाला होता. ती राष्ट्रमीमांसा संस्कृतीमीमांसा करणे आवश्यक होते व ती मीमांसा लोकानुवर्ती, प्राकृत, अवैदिक आणि अनेकपदरी करणे जरूर होते. *राष्ट्रमीमांसे*ला उत्तरादाखल म्हणून अर्थातच *भारतीय संस्कृती* लिहिले गेले नाही. तिशीच्या मध्याला भारतीय संस्कृतीसंबंधी जो संकल्पनाव्यूह महाराष्ट्रात रूढ व मान्य होता तो संकल्पनाव्यूह भारतीय संस्कृतीचा एक संदर्भ आहे. वितंडा हा सानेगुरुजींच्या शैलीचा विशेष नव्हे एरव्ही त्या विचाराची अधिक परखड व स्पष्ट समीक्षा वितंडारूपाने त्यांच्या लेखनात दिसली असती.

त्या काळात दुसरा प्रवाह मार्क्सवादी विचाराचा होता. त्या विचारातल्या दोन मांडण्या – मटीरिॲलिझम आणि आयडिॲलिझम (भौतिकवाद आणि चैतन्यवाद) ह्या कोटी सानेगुरुजींच्या लेखी महत्त्वाच्या नव्हेत. एकूणच गांधीवादाच्या दृष्टीने व विशेषतः महाराष्ट्रीय गांधीवादात महत्त्वाच्या नव्हेत. ह्याची चर्चा वर आलीच आहे. सानेगुरुजी साम्यवाद आणि गांधीवाद ह्यांचा विचार आणखी दोन अंगाने करतात. ही दोन्ही अंगे त्यांच्या संस्कृतीविचाराशी निगडित आहेत. म्हणजे त्यांच्या संस्कृतीविचाराचा भाग आहेत. ती पर्यायाने मार्क्सवादी विचाराचा प्रतिवाद ठरतात एवढेच. सानेगुरुजींच्या संस्कृतीविचाराचा समारोप त्या अंगांचा विचार करून करणे समर्पक ठरेल.

साम्यवाद्यांची श्रमिकांविषयीची कणव, त्यांच्यासाठी झटण्याची वृत्ती ह्याचे महत्त्व त्यांनी मांडले आहे. त्यांच्या विवेचनात उत्पादनसाधनांचा (means of production) उल्लेख येतो. फक्त ते त्याला सेवासाधने म्हणतात. पुनः हे विश्लेषणकोटी बदलण्यापैकी झाले! एवढे पुरे नव्हते म्हणून की काय ते "साम्यवाद म्हणजे एक प्रकारे कृतीत आणलेला वेदान्त होय" (*भा.सं.*, पृ. ५) असेही म्हणतात. कम्युनिस्ट त्यांच्या लेखी श्रमण आहेत. त्यांचा कम्युनिष्टांविषयीचा दृष्टिकोन, एका आधुनिक मराठी नाटकात म्हटल्याप्रमाणे, कम्युनिस्ट हे समकालीन युगातले श्रमण होत असाच आहे. आपणासारखे करिती तात्काळ हा संतपरंपरेचा धर्म सानेगुरुजींच्या संस्कृतीविचारात सर्वत्र दिसतो. तोच त्यांनी साम्यवाद्यांना लावला आहे. अर्ध्याअधिक कम्युनिस्टांना त्याचे रहस्य कळायचे नाही; उरलेल्या अर्ध्याअधिकांना पटायचे नाही.

सर्वात महत्त्वाचा विचार मात्र श्रमाचा (लेबर) आहे. भांडवलशाहीच्या उदयावरोबर 'लेबर' फार महत्त्वाचे झाले. एका प्रकारे ते मध्यवर्ती झाले. वर्णधर्माशी संबंधित अशा श्रमविषयक दृष्टिकोनावर आता नव्या औद्योगिक संस्कृतीतल्या श्रमविषयक दृष्टिकोनाचे आरोपण झाले. मार्क्सवादाचे सत्ताशास्त्र





अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

आणि क्रांतिविज्ञान 'श्रम' ह्या मध्यवर्ती कल्पनेवर आधारलेले आहे. त्याचा संदर्भ बदलणे आणि भारतीय अध्यात्मात 'लेबर' ही कोटी बसविणे हे एक काम गांधीवादाने केले. मार्क्सच्या लेखी 'लेबर' अतिरिक्त मूल्य (सरप्लस् वॅल्यू) निर्माण करते. गांधीविचारात तेच 'लेबर' उपासना-मूल्य (वरशिप वॅल्यू) निर्माण करते. सानेगुरुजींच्या शब्दांत मग थिअरीपेक्षा, तत्त्वज्ञानापेक्षा श्रम (एक उपासनामूल्याचे जनक म्हणून) जास्त महत्त्वाचे ठरते.

*एक हात भू नांगरणे*
*शत व्याख्यानाहुन थोर*
*एक हात खादी विणणे*
*मंत्रजपाहुन ते थोर*

असे श्रमाचे दैवी मूल्य ह्या संस्कृतीत होते, म्हणजे व्हायला हवे असा हा पक्ष आहे. "हा आता आपला मंत्र, ही आहे भारतीय संस्कृती".

ह्या श्रमशक्तीच्या आध्यात्मिक मांडणीचे आणि मार्क्सच्या श्रमशक्तीचे काही देणेघेणे नाही हे तर उघडच आहे. पण येथल्या आध्यात्मिक परंपरेत 'लेबर' ही कोटी बसविणे कालदृष्ट्या महत्त्वाचे होते. ते विनोबा-सानेगुरुजी ह्यांनी केले आणि महाराष्ट्रीय गांधीवादाचा एक नवा पैलू स्पष्टपणे पुढे ठेवला असे म्हणता येईल.

सानेगुरुजींचा संस्कृतीविचार हा संस्कृतीचे वर्णन, विश्लेषण आणि त्या संस्कृतीचे पुनःसर्जन ह्या दोन बिंदूंत घोटाळणारा आहे. ते काही वर्णन, विश्लेषण करताहेत असे दिसते तेवढ्यात ते संस्कृतीच्या उत्कर्षासाठी काय करायला पाहिजे हे सांगताहेत असे लक्षात येते. त्या अर्थाने त्यांचा संस्कृतीविचार विश्लेषक आणि आदर्श घालून देणारा (ॲनलिटिकल आणि नॉर्मेटिव्) दोन्ही आहे. आजची वस्तुस्थिती आणि उद्याचे सिद्ध होऊ शकणारे संकल्पनाव्यूह ह्यांच्या परस्परसंबंधातून त्यांचा संस्कृतीविचार सिद्ध होतो. अध्यात्मातून आधिदैविक आणि भौतिक दोन्ही सिद्ध होते अशी त्यांची भूमिका आहे. "खऱ्या सद्धर्माजवळ श्री, वैभव, जय ही ठेवलेलीच असतात" (*भा.सं.*, पृ. ६५) अशी त्यांची भूमिका आहे. "ते पाषाणही आघवे। चिंतारत्ने का नोहावे। तिये भूमिके का न यावे। सुवर्णत्व" ह्या ज्ञानदेवांच्या शब्दांस शोभेल अशा विश्वासाने त्यांनी ती भूमिका मांडली आहे.

**टीपा आणि संदर्भ**

(*भारतीय संस्कृती* ह्या पुस्तकातले संदर्भ निबंधातच (*भा.सं.*, पृष्ठक्रमांक असे) दिले आहेत. अ.के. भागवत संपादित *आचार्य भागवत संकलित वाङ्मय* ह्या महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाने १९८७ त प्रसिद्ध केलेल्या दोन खंडांतले संदर्भ इथे खाली *आ.भा.सं.वा.* खंडक्रमांक, पृष्ठक्रमांक असे दिले आहेत)


१. K.P. Bahadur (Editor and Translator) : *Hindu Scriptures of Spiritual Truth*, Heritage Publishers, Delhi,1979.
ह्या पुस्तकाची विनोबांनी लिहिलेली एक पानाची प्रस्तावना.
२. मनूचे नेमके कोणते वचन सानेगुरुजींना अभिप्रेत आहे ते कळत नाही. बहुधा मनुस्मृतीच्या १२ व्या अध्यायातील ९५ व्या श्लोकात स्मृती "याश्च भाश्च कुदृष्टयः" (ज्या स्मृती तर्कदुष्ट आहेत) सर्वास्ता निष्कलाः (त्या सर्वप्रकारे निष्फल होत) असे म्हटले आहे. ते वचन त्यांना अभिप्रेत असावे.
३. *अभिसमयालंकार* – ८-१० – अशाच आशयाची मांडणी *बोधिसत्त्वभूमि* १ मध्येही आढळते. दोन्ही अवतरणे आणि त्यांच्यावरच्या भाष्यासाठी, पाहा – Padmanabh S. Jaini : *The Jain Path of Purification*, Berekeley, 1979.
४. Anand Coomarswamy -- *Art and Swadeshi*; Madras (तारीख नाही), P. 3.
५. Ibid, p. 12.
६. *आ.भा.सं.वा.* १, पृ. १२३.
७. Anand Coomarswamy, *What is Civilisation?*, Oxford University Press, Delhi, 1989, p. 18.
८. Friedrich Max Muller, *Three Lectures on the Vedanta Philosophy*, London, 1901 (2nd Edition), p. 16.
९. Ibid.
१०. आ.भा.सं.वा. १, पृ. ८६.
११. आ.भा.सं.वा. १, पृ. ११.
१२. कित्ता १, पृ. ४७.









राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# आपणच आपली तपासणी करू या

चिं.मो. पंडित

श्री. चिं.मो. पंडित हे नामवंत स्थापत्य विशारद (स्ट्रक्चरल इंजिनियर) असून चोख शास्त्रपूत व्यावसायिक सल्लागार (कन्सल्टंट) म्हणून त्यांचा मोठा लौकिक आहे. काही वर्षे व्यवसाय केल्यावर, ज्ञानसंपादनाच्या ओढीने अभियांत्रिकीच्या विषयात (जर्मनीत) संशोधन करून डॉक्टरेट पदवी मिळवली. अनेक वर्षे महाराष्ट्र विज्ञान परिषदेचे पदाधिकारी राहिले. आजच्या आर्थिक-औद्योगिक-तंत्रवैज्ञानिक समाजव्यवस्थेला निसर्गसृष्टी व मानवजात, दोहोंच्याही हितार्थ विधायक पर्याय शोधायला हवा, साकार करायला हवा याविषयी ज्यांची खात्री पटली आहे अशांपैकी पंडित हे एक आहेत. विचार आणि आचार यातले अंतर कमी करीत राहण्यावर त्यांचा कटाक्ष आहे.

प्रस्तुत टिपण त्यांनी थोड्या संक्षिप्त व वेगळ्या स्वरूपात *अनुभव* मासिकाच्या दिवाळी १९९८ च्या अंकात प्रसिद्ध केले होते. या टिपणातील प्रश्नावलीला वाचकांपैकी कोणी प्रतिसाद दिला नाही याची त्यांना खंत आहे. पंडितांनी जो विषय येथे मांडला आहे व जे मुद्दे/प्रश्न उपस्थित केले आहेत त्याला धरून *नवभारत*च्या वाचकांनी साधकबाधक चर्चा करावी असे आम्ही आवाहन करीत आहोत.

– *संपादक*

---

सध्या आपण एका अतिशय आवेशपूर्ण, अभिनिवेशपूर्ण वातावरणातून जात आहोत. आर्थिक आघाडीवर तर इतका गलबला माजला आहे की गोंधळायलाच व्हावे. एकीकडे सुखी जीवनासाठीची अनेकविध प्रलोभने दुसरीकडे बेरोजगारांचे (यात सुशिक्षित, अर्धशिक्षित, तरुण, मध्यमवयीन सर्व आले) तांडे; राजकीय पातळीवर सर्वपक्षीय भ्रष्टाचार आणि तारतम्यहीन लोकनुरंजनासाठी चढाओढ; सामाजिक स्तरावर नवीन जाणिवा जागृत झालेला, काहीसा उतावळा, ऐकून घेण्याच्या मनःस्थितीत नसलेला आक्रमक दलितवर्ग (यात स्त्रियाही आल्या) असे सर्वसामान्य चित्र आहे. शेतीसकट सर्व उत्पादक क्षेत्रांत नवीन आंतरराष्ट्रीय चढाओढ येऊ पाहत आहे. या पार्श्वभूमीवर सुचलेले काही विचार इथे चर्चेसाठी मांडत आहे. मी तत्त्वज्ञ नाही, समाजशास्त्रज्ञ नाही, अर्थतज्ज्ञही नाही. मात्र संवेदनशील विचार करणारा आणि सामाजिक बांधिलकी मानणारा सर्वसामान्य नागरिक आहे आणि वरील तज्ज्ञांकडून मार्गदर्शनाची अपेक्षा करत आहे, खुल्या चर्चेची अपेक्षा करत आहे.

दुसऱ्या महायुद्धानंतर जगभर अनेक लोकांच्या स्वातंत्र्याची आणि समाजवादी लोकशाहीची एक लाटच आली. अनेक देश राजकीयदृष्ट्या स्वतंत्र झाले किंवा साम्यवादाच्या (समाजसत्तावादाच्या) एकछत्री अंमलाखाली आले (उदा. रशिया व त्याची अंकित राष्ट्रे). राजकीय विचारप्रणाली काहीही असली तरी उत्पादनाची पद्धत आणि जीवनाच्या संकल्पना एकच राहिल्या. त्या अशा –

१. यांत्रिकीकरणातून प्रचंड प्रमाणावर उत्पादन करणे. यात शेतीचाही अंतर्भाव आला.
२. सर्व प्रकारच्या व सर्व ठिकाणच्या निसर्गसाधनांचा उपभोगासाठी वापर करणे. (मुंबईने शहापूर तालुक्याचे पाणी वापरणे, अमेरिकेने मलेशियाची जंगले तोडणे, उत्तर प्रदेशाने मध्यपूर्वेचे तेल आणणे, इंग्लंडने आसामचा चहा पिणे....)

या सर्वांचे दोन परिणाम झाले. माणसाच्या फावल्या वेळात आणि फुरसतीत वाढ झाली. समाजात अनेक लोक वेळच वेळ असलेले निर्माण झाले. तसेच बेकारही निर्माण झाले. त्यातून रोजगार निर्मितीच्या आघाडीवर 'सेवा विभाग' निर्माण झाला. पूर्वी राजेरजवाडे, सरदारदरकदार, सावकार सोडले तर ९० टक्के जनता शेतीकामात गुंतलेली असे.









राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

माणसं वरीचशी कामं आपली आपणच करत. आज अमेरिकेत फक्त ६-७ टक्के लोकसंख्या शेतीकामात व्यस्त आहे आणि तरीही अमेरिका अन्नधान्य आणि शेतीमाल मोठ्या प्रमाणावर निर्यात करते. मात्र सेवा विभागात त्यांची १८-२० टक्के जनता गुंतलेली आहे.

प्रचंड उत्पादनाचा एक विशेष म्हणजे ते भांडवली गुंतवणुकीवर आधारित असते. मग ही गुंतवणूक खाजगी असो नाहीतर सरकारी असो. मोठे मोठे कारखाने, प्रचंड यंत्रसामग्री, पाणी आणि ऊर्जा यांचा सढळ वापर, व्यवस्थापक वर्ग – यंत्रावर काम करणारा मजूर – विक्री करणारा विक्रेतावर्ग, तसेच सर्वदूर पसरलेली वितरण व्यवस्था (यात वाहतुकीचा अंतर्भाव आला) आणि खेळते भांडवल ही याची प्रमुख लक्षणे आहेत.

तंत्रज्ञानाच्या प्रगतीबरोबरच उत्पादन जास्त जास्त प्रमाणावर स्वयंचलित यंत्रांवरून व्हायला लागले. माणसे उत्पादक रोजंदारीतून बाहेर फेकली जाऊ लागली. 'नफा' हा एकमेव निकष या व्यवस्थेत आला. अर्थव्यवस्था मुद्राभिमुख व्हायला लागली. ज्याच्या हातात चार टिकल्या असतील तोच काही खरेदी करणार. काही कसब शिकून घेतले असेल तोच रोजगार मिळवणार. म्हणजे त्याच्याच हातात खरेदीचे साधन असलेला पैसा असणार. यातून माणूस हा 'विकाऊ वस्तू' बनला. त्याला चढाओढीच्या बाजारात उभे राहून आपले मोल ठरवून घ्यावे लागले. प्रत्येक सक्षमाला काम (जगण्याचा हक्क) मिळालेच पाहिजे हा मूलभूत हक्क कागदावरच राहिला. प्रत्यक्षात मजुरांच्या बाजारपेठाच परिणामकारक ठरू लागल्या. आता तर या मुद्रांचा, चलनांचाही मोठा व्यापार होतो.

सारांश, प्रचंड उत्पादन आणि सर्वंकष उपभोग हीच आजच्या मानवसमाजाची विकासाची व्याख्या झाली आहे, आणि प्रत्येकाची आकांक्षा ठरली आहे. जसजसा काळ जाऊ लागला तसतसे लक्षात येऊ लागले की, या व्यवस्थेतून समाजांतर्गत विषमता फार वाढते. जास्तीत जास्त आणि कमीत कमी व्यक्तिगत उत्पन्नाचे प्रमाण ५००:१ असेसुद्धा होऊ लागले. यात अर्थातच अंबानी, मार्कोस किंवा बेरोजगार यांचा समावेश नाही. नाहीतर प्रमाण अगणित-शून्य असे होईल. एकीकडे बेरोजगारांची संख्या वाढू लागली तर दुसरीकडे उत्पादनांच्या साधनांचे ध्रुवीकरण होऊ लागले. दोघांचा एकत्रित परिणाम म्हणजे माणसे जगण्याच्या मूलभूत हक्कापासूनच वंचित व्हायला लागली. यातून विकासाच्या या प्रतिमानाविषयीचा पहिला उत्साह ओसरू लागला. 'पर्यायी विकासा'ची चर्चा पुढे येऊ लागली. राजकीय, आर्थिक तोडग्यांचा शोध सुरू झाला.

– २ –

मात्र या पार्श्वभूमीवर वैयक्तिक जीवनशैली, जीवनमान याविषयी कोणी फारसे बोलत नाही. आपण हे सर्व जाणतोच. एकदा प्रामाणिकपणे आपणच आपली तपासणी करूया का? समाजातील आघाडीचे लोक जे करतात, आचरतात (बोलतात नव्हे) तेच सामान्यजन करू पाहतात.

यासाठी आपणच आपल्याशी खालील प्रश्नांची उत्तरे द्यावीत.

प्रश्नावली :

१. **स्वयंपाकघरात अनुक्रमे कशाला प्राधान्य द्याल?**
(या प्रश्नांची उत्तरे घरातल्या स्त्रियांनी द्यावीत.)
अ. *निर्धूर कार्यक्षम चूल/कोळशाची किंवा भुशाची शेगडी/ रॉकेलचा स्टोव्ह/गॅसची शेगडी, बायोगॅस*
ब. *पाटा वरवंटा/विळी/सुऱ्या/मिक्सर, ग्राइंडर, मायक्रोवेव्ह*
क. *अल्युमिनियमची, स्टेनलेस स्टीलची, नॉनस्टिक भांडी*
ड. *साधा कुकर, प्रेशर कुकर, सोलर कुकर*
इ. *खाद्यपदार्थ* – तयार, की घरी केलेले (मसाले, पापड इ.)
*मधल्या वेळचे खाणे* – घरचे की विकतचे (चिवडा, लाडू)
*फळे व भाज्या* – स्थानिक पिकणाऱ्या की बाहेरून आलेल्या, मोसमाप्रमाणे की मोसम सोडूनदेखील.

२. **घरात काय काय हवं?**
टेबल, खुर्च्या : लाकडी, लोखंडी
दारे-खिडक्या : लाकडी, लोखंडी, ॲल्युमिनियम, सिंटेक्स-सारखी.

३. **यापैकी काय नसेल तर चालेल?**
फ्रीज, रेडिओ, टी.व्ही., टेप रेकॉर्डर, साऊंड सिस्टिम, व्ही.सी.आर.
– सार्वजनिक चालतील?

४. **प्रवास व वाहन** – प्रकार कोणता आवडेल?
*रोजचा प्रवास* : स्वतःचे वाहन – सायकल, स्कूटर, मोटार की सार्वजनिक वाहतूक व्यवस्था.
*नैमित्तिक प्रवास* : स्वतःचे वाहन, सार्वजनिक वाहतूक




मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

(बस, रेल्वे, विमान)

५. **संपर्कासाठी काय काय हवे?** खाजगी, सार्वजनिक टपालसेवा, कुरिअरसेवा.
टेलिफोन : साधा, आय.एस.डी., एस.टी.डी., फॅक्स, टेलेक्स, ई-मेल

६. **मुलांच्या शिक्षणावर वार्षिक खर्च किती होतो?**
(शाळा, कॉलेजच्या फिया, पुस्तके, युनिफॉर्म सोडून.)
उदा. खेळ, व्यायामशाळा, पुस्तके, कला (संगीत, ड्रॉइंग), सहली, कपडालत्ता.

७. **घरात**
कपडालत्ता, सौंदर्यप्रसाधने, दंतमंजन, सावण.... किती खर्च होतो?
वाचनीय पुस्तके, वर्तमानपत्रे, मासिके.... किती खर्च होतो?

८. **पर्यावरणाचा दृष्टिकोन लक्षात घेऊन –**
पाठकोरे कागद वापरता का?
पाकिटे पुन्हा वापरता का?
पाठपोठ झेरॉक्स घेता का?
प्लास्टिक पिशव्या, वेष्टने इ. चा वापर टाळता का?
दैनिक वृत्तपत्राऐवजी फक्त साप्ताहिक आवृत्ती चालेल का?
(बातम्या आकाशवाणी, दूरदर्शनवर मिळतातच.)

९. **अ. सर्वोच्च वेतन व किमान वेतन यांचे कोणते प्रमाण समाजात असावे?**
प्रमाण : १०:१, १५:१, २०:१, ५०:१, १००:१
(वेतनात प्रवास भत्ता, सदनिकाभाडे, दूरध्वनी, हॉटेलखर्च अशा सर्व सोयी-सवलतींचा बाजारभावाने समावेश करावा)
**ब. वेतनाच्या किती टक्के निवृत्ती-वेतन असावे?**
३५ टक्के ते ९५ टक्के या दोन टोकांमध्ये पडणारे योग्य वाटणारे प्रमाण सुचवावे.
– *हे निवृत्ती-वेतन किती वर्षे मिळावे?* आजीव, २० वर्षे, १५ वर्षे, नोकरीच्या वर्षाच्या ५० टक्के वर्षे?
**क. स्वतंत्र व्यवसाय करणारांना** (हातगाडीवाले, छोटी वर्कशॉप्स, वकील, डॉक्टर्स, अभियंते, भाजी-विक्रेते) निवृत्ती वेतन मिळावे का?
– किती मिळावे?
– की नुसताच महागाई भत्ता, प्रवास भत्ता, औषधाचा भत्ता मिळावा? त्यांनी शिल्लक टाकलेल्या पैशाची क्रयशक्ती कमी होत जाणार म्हणून.
– शेतमजूर, बांधकाम मजूर यांचे काय?
– खुद्द शेतकऱ्याचे काय?

१०. **आजचेच विकासाचे प्रतिमान असो अथवा बदलून पर्यायी विकासाचे प्रतिमान असो** – आपले आजचे राहणीमान ५ वर्षांसाठी गोठवून घ्यायला तयार व्हाल का? म्हणजे पैसा, साधनसंपत्तीचा ओघ गरिबांकडे वळविता येईल.

टीप : *क्र. १ ते ५ या प्रश्नांच्या बाबतीत आपण स्वतः सध्या काय वापरता तेही लिहावे.*

जितक्या जणांना मी वैयक्तिकरीत्या हे प्रश्न विचारले, चर्चा केली त्या सर्वांना – यात सर्वसामान्य माणसे, कार्यकर्ते, अर्थतज्ज्ञ, विचारवंत इ. आहेत – यातील अद्ययावत सुविधा हव्या आहेत, स्वतःला तोशिष न लावता जास्तीत जास्त फायदे हवे आहेत. ८ व ९ वर त्यांनी विचारच केलेला नव्हता. त्यामुळे एकदम उत्तरे सुचली नाहीत.

– ३ –

१. समाजाचा एकंदर ओढा लक्षात घेता विचार येतो की, मग अनेक कार्यकर्ते ज्याचा पुरस्कार करू पाहत आहेत तो 'पर्यायी विकास' कोणी, कसा आणायचा? यात दुटप्पीपणा आहे का? म्हणजे मला हे सर्व हवे, पण 'त्यांनी (गरिबांनी, वंचितांनी)' साधेपणाने राहावे. उगीच महत्त्वाकांक्षा बाळगू नयेत.

म्हणूनच पर्यायी विकासाविषयी ज्यावेळी चर्चा होत असते तेव्हा पर्याय कशाला याचा विचार व्हायला हवा. आजच्या विकासाच्या संकल्पनेला पर्याय असू शकतो किंवा विकासाची आजची लोकांच्या मनातील संकल्पना तीच पण तिथे पोहोचण्याच्या आजच्या आर्थिक-राजकीय पद्धतीला पर्याय असू शकतो. उदा. एककेंद्रित उत्पादन आणि राजकीय सत्तेच्या ऐवजी विकेंद्रित व्यवस्था आणणे या दोन्हीलाही म्हणजे व्यवस्थेला आणि विकासाच्या संकल्पनेलाही पर्याय असू शकतात. मात्र याची स्पष्ट कल्पना मांडून हे संक्रमण कसे आणायचे याची तपशिलवार कृतियोजना कोणीतरी मांडणे जरूर आहे.

२. गांधीजी घड्याळ, चष्मा, पेन, कागद या वस्तू वापरीत असत. त्या सर्वांनाच उपलब्ध व्हाव्यात याबद्दल







अनुक्रमणिका

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

दुमत असू नये. याला 'चंगळवाद'ही म्हणू नये. ज्या मोठ्या प्रमाणावर या वस्तूंची निर्मिती करावी लागेल ती निर्मिती आधुनिक महाप्रमाण उत्पादन तंत्रविज्ञाना (mass production techniques) शिवाय कशी शक्य आहे? शिवाय यासाठी विज्ञान-तंत्रज्ञानातील संशोधनही लागणार. घड्याळाची दीर्घकाल लवचिकता टिकवून ठेवणारी स्प्रिंग बनवायची तर धातुशास्त्राचा अभ्यास हवा. दातेरी चाके करायची तर सूक्ष्म यंत्रशास्त्राचा अभ्यास हवा. डायलचा रंग उडून जाऊ नये म्हणून रसायनशास्त्राचा अभ्यास हवा. असे सर्वंकष संशोधन हवेत होत नाही, त्याला सर्व समाजातच एक वातावरण भरून राहावे लागते.

३. माणसांनी आपले सर्व आयुष्य पंचक्रोशीतच काढावं की विशाल जगात? माणसांनी गतिशील असावं की स्थितीशील? गतिशील याचा इथला संदर्भ हा केवळ प्रवासाशी नसून खाणेपिणे, कपडालत्ता, फावल्या वेळाची करमणूक इ. इ. शी निगडित आहे, गतानुगतिकतेशी निगडित आहे, एकसुरी पिढ्यान् पिढ्या जीवन जगण्याशी आहे.

या गतिशीलतेत संस्कृतीचे वैचित्र्य, वैविध्य लोप पावत आहे. सर्व जगभर एकछाप संस्कृती आकाराला येत आहे. अशा परिस्थितीतून जैविक वैविध्यता नाश पावली तर म्युटेशन्स कशी होणार? उत्क्रांती कशी होणार? माणसाच्याही पुढे उत्क्रांतीचा टप्पा असेल? कोणता?

४. बरेच वेळा असे दिसते की, कार्यकर्ते ज्या भागाचा व ज्या तऱ्हेचा 'विकास' घडवून आणण्याचा प्रयत्न करतात त्याच्या आधारभूत बाजारपेठा तर मुंबई-पुण्याच्या असतात. या मुंबई-पुण्याचे पैसे येतात कोठून? कोणच्या व्यवस्थेतून? असल्या पैशाच्या बाजारपेठांवर अवलंबून राहणे कितपत नैतिक आहे? ज्या मॉडेल विरुद्ध लढायचे त्याच्यावरच अवलंबून राहणारे पर्यायी मॉडेल कसे चालेल?

५. अतिरिक्त उत्पादन आणि बाजारपेठा टाळता येतील?

६. लोकांपुढे प्रतिमान ठेवायचे ते सर्वोदयी-आश्रमीय जीवनाचे असून चालणार नाही. जगात कुठेही 'आश्रम' यशस्वी झाले नाहीत, टिकून राहिले नाहीत. टिकली ती निर्जीव कलेवरे. कारण आश्रमीय जीवनात आयुष्य कुचंबते, तुंबते, किंबहुना सर्वच संस्थात्मक शिस्तीत व्यक्तिगत उत्फुल्लितेला फार त्रास होतो आणि व्यक्तिविकास रोखून समाजविकास होत नाही. होमहवनांचे, वेदांचे भूतकाळातील मूलतत्त्ववादी प्रतिमानही चालणार नाही. माणुसकी भरलेले, विज्ञान-तंत्रज्ञानाचा धिक्कार न करणारे, त्याची योग्य पारख करणारे प्रतिमानच लागेल.

एका सुस्पष्ट जीवनविषयक तत्त्वज्ञानाची आज उणीव भासते आहे. विज्ञानाच्या प्रचंड प्रगतीमुळे इतकी नवनवी माहिती पुढे आली आहे की, पूर्वीच्या पापपुण्याच्या, परमेश्वरा-विषयीच्या संकल्पना पुढे ठेवून मानवी समूह आज एकसंध, मायाळू, सहिष्णू व नेमस्त ठेवणे अशक्य दिसत आहे. तथाकथित अध्यात्मवाद हा एरवीही फार मोजक्याच लोकांना जमला होता. इतरांबद्दल आदर, भूतदया अशा ध्येयवादी, आदर्शवादी विचारसरणींची पीछेहाट होताना दिसते आहे. अशा वेळी नैतिक आचार आणि नैतिक विचार यांची विकृत, अतिरेकी व्यक्तिस्वातंत्र्याच्या कल्पनांपुढे पीछेहाट होते आहे की काय अशी शंका येते. या सर्व गडबडीत पर्यावरणाचा विनाश, प्रचंड लोकसंख्या आणि जगड्व्याळ आर्थिक व्यवस्थेबरोबर असहाय फरफट असे चित्र दिसते आहे.

यासाठीच जाहीर चर्चेचे हे आवाहन.



---

***चुकीची दुरुस्ती :***

*नवभारत*च्या एप्रिल १९९९ अंकात पृ. ५२-५३ वर डॉ. ग.वा. तगारे यांचे संपादकांना आलेले पत्र प्रसिद्ध झाले आहे. या पत्रात त्यांनी *नवभारत*च्या जानेवारी १९९९ च्या अंकात प्रसिद्ध झालेल्या 'धर्मचक्रप्रवर्तनसूत्र' या प्रा. मे.पुं. रेगेकृत अनुवादातील, नजरचुकीने राहून गेलेल्या दोन चुका निदर्शनास आणल्या होत्या. यापैकी दुसरी चूक दुरुस्त करणारा बरोबर शब्द छापताना मुद्राराक्षसाने घोटाळा केला. याबद्दल आम्ही डॉ. ग.वा. तगारे व *नवभारत*चे वाचक यांची क्षमा मागतो.

मूळ अनुवादलेखात (नवभारत जानेवारी १९९९) पान १ व ५ वर 'मिगदाय' या शब्द आला आहे तिथे तो मिगदाव (म्हणजे मृगारण्य) असा हवा अशी दुरुस्ती डॉ. तगारे यांनी केली होती.

– *संपादक*

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अनुक्रमणिका

वाद-संवाद

# ४२चा 'भारत छोडो' लढा

## वसंत पळशीकर

श्री. विश्वास दांडेकर यांनी जानेवारी १९९९ च्या अंकात बेचाळिसच्या लढ्याविषयी काही प्रश्न उपस्थित केले आहेत. अशा मोठ्या घडामोडींचे 'वाचन' व विश्लेषण सर्वांचे एकच येणे जवळपास अशक्य आहे. त्यांच्या पत्रातील मुद्यांसंबंधी चर्चा वाढवावी असे मनात नव्हते.

दरम्यान श्री. राजमोहन गांधी याचे *द गुड बोटमन* हे गांधींवरील पुस्तक वाचण्यात आले. भारताची फाळणी टळू शकली असती का, काय वेगळे घडू शकले असते, कोणाचे काय चुकले, हे मुद्दे विवाद्य राहिलेले आहेत. त्यांची अखंड चर्चा चाललेली आहे. या विषयावरील वरील पुस्तकातील 'पार्टिशन' हे प्रकरण वाचत असताना मनात आलेल्या काही गोष्टी लिहिणे उपयोगाचे होईल.

जगाच्या भल्याच्या दृष्टीने दुसऱ्या महायुद्धामध्ये ब्रिटन-फ्रान्स आदि दोस्त राष्ट्रांचा विजयच व्हायला हवा; म्हणून, भारताला एकतर्फी निर्णयाद्वारे ब्रिटनने युद्धात सहभागी करून घेतले याविरुद्ध निषेध नोंदवीत असतानाच, प्रांतांमधील सत्तेचा त्याग करीत असतानाच, युद्ध चालू असेतोवर युद्धप्रयत्नांना खीळ बसेल, ब्रिटन युद्धात कमजोर पडेल असा लोकलढा उभारावयाचा नाही याविषयी गांधींचा पक्का निर्णय मनाशी झालेला होता.

उलटपक्षी, ब्रिटनची झालेली कोंडी (१९३९-४१ या काळात ब्रिटनची कोंडीच झालेली होती) ही आपली सुवर्ण संधी आहे, असे काँग्रेसमधील बहुतेक, विशेषतः तरुण पिढीतल्या नेत्यांचे म्हणणे होते. यात नेताजी सुभाषचंद्र बोस, काँग्रेस सोशॅलिस्ट पार्टीतली तरुण नेते मंडळी ही अग्रगण्य म्हणता येतील. सुभाषबाबू गांधींच्या इच्छेविरुद्ध दुसऱ्यांदा काँग्रेसचे अध्यक्ष म्हणून निवडून येण्याइतके या मंडळींचे काँग्रेसमध्ये वळही होते.

शिवाय या मंडळींचा शस्त्र हाती घेण्याला विरोध तर नव्हताच; उलट, अहिंसेविषयीचा गांधींचा आग्रहही त्यांना, ब्रिटनच्या दुबळ्या स्थितीत, आत्मघातकी बंधनासारखा वाटत होता. गांधींचे नेतृत्व न जुमानता सशस्त्र लढा उभारावा, यासाठी जर्मनी व त्याची सहकारी राष्ट्रे यांची मदत घ्यावी, यासाठी आतून काही विचार व तयारीही चालली असण्याची शक्यता आहे. जर्मनीने सोविएत रशियावर स्वारी केल्यावर कम्युनिस्ट हे युद्धात दोस्त राष्ट्रांच्या पक्षास मिळाले. रॉयिस्ट हे प्रथमपासूनच फासिस्टांच्या विरोधात होते. काँग्रेसच्या नेत्यांपैकी जवाहरलाल नेहरू मुसोलिनी व हिटलर यांच्या कट्टर विरोधात होते. अशी अंतर्गत दुफळी नसती तर सशस्त्र उठावाची गोष्ट झालीच नसती असे म्हणता येत नाही.

मुद्दा असा की, १९३९ साली काँग्रेस मंत्रिमंडळाने राजीनामा दिल्यानंतर, लढाऊ कृतीसाठीचा एक सततचा दबाव महात्मा गांधींवर होता. अमेरिका युद्धात उतरल्यावर, भारताला युद्धाच्या समाप्तीनंतर स्वातंत्र्य देण्याची घोषणा करावी, आणि युद्ध चालू असतानाच्या काळात अंतर्गत कारभारात सत्ता अधिक बहाल करावी व काँग्रेसचे युद्धप्रयत्नात सहकार्य मिळवावे यासाठी अमेरिकेचे अध्यक्ष रूझवेल्ट, चीनचे नेते चँग कै-शेक यांचा चर्चिल यांचेवर दबाव आला. आघाडी शासनातील मजूर पक्षाचीही याला अनुकूलता असल्यामुळे, नाइलाजाने, चर्चिल यांनी क्रिप्स यांना शिष्टाईवर पाठविले. पण भरीव स्वरूपात काँग्रेसच्या मागण्या मंजूर न करण्याविषयी चर्चिल ठाम राहिल्याने शिष्टाई वाया गेली. असंतोष अधिकच तीव्र झाला. शक्तिप्रदर्शन करून, आमच्या सहकार्याशिवाय भारताचा कारभार चालवणे–सुरळीतपणे चालविणे–केवळ अशक्य आहे, भारतीय भूमीवरून युद्ध खेळणे तुम्हाला आम्ही अवघड करून ठेवू शकतो, हे इंग्रज राज्यकर्त्यांना दाखवून दिले नाही तर लोकांच्या नजरेतून काँग्रेस उतरेल आणि स्वातंत्र्य आणखी लांबणीवर पडेल, असे काँग्रेसजनांचे मत असणार.

या सर्व परिस्थितीत स्वतःची सारी इभ्रत पणाला लावून गांधींनी काँग्रेसला लढा न करण्याच्या भूमिकेवर रोखून धरले. यात त्यांना मनापासून एक नेहरूंचीच साथ होती. (निष्ठावंत गांधी-अनुयायी सोडता.)

गांधींच्या त्यावेळच्या पत्रव्यवहारावरून असे लक्षात येते

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

की, व्हाइसरॉय लिनलिथगौ यांच्याशी गांधींचे, गांधींच्या बाजूने तरी, विशेष आत्मीय व विश्वासाचे संबंध प्रस्थापित झाले होते. नाझी जर्मनीबरोबर चालू असलेल्या युद्धात गांधी उघडपणे ब्रिटनचा पक्ष मनःपूर्वकतेने घेत आहेत, लढा उभारण्यासाठीचे काँग्रेसमधील अंतर्गत दडपण रोखून धरीत आहेत, हा प्रत्यक्ष अनुभवही उभयतांमधील सामंजस्य व परस्परविश्वास यांना कारणीभूत असेल, असे म्हणता येईल.

अवघ्या काही महिन्यांच्या काळात गांधींनी आपली भूमिका का बदलली? ऐन भरात आलेला लढाही १९२२ साली त्यांनी मागे घेतला होता. तेव्हा, काँग्रेसमधील त्यांच्या नेतृत्वाला धक्का लागू नये म्हणून आपणच लढ्याचे रणशिंग फुंकावे या प्रकारचा गांधींचा स्वभाव नव्हता. भूमिका बदलण्यापाठीशी तशीच काही गंभीर व तातडीची कारणे असली पाहिजेत.

साधारण राजकारणी पुढारी ज्या प्रकारच्या मनोभूमिकेमधून व धोरणीपणाने निर्णय घेतो ती मनोभूमिका वा तो धोरणीपणा गांधींच्या वागण्या-कृतीच्या मागे नसे. श्री. दांडेकरांनी गांधींचे हे मूलभूत वेगळेपण ध्यानात घेऊन कारणांचा शोध घेतला पाहिजे. दुसरी गोष्ट अशी की, गोपनीयतेचे आपले एक स्थान व महत्त्व गांधी जाणत व विश्वासाने झालेले सगळेच बोलणे उघड करीत नसत ही गोष्ट खरी, पण त्यांचे राजकारण छक्क्यापंजांचे नसे; हातातले पत्ते समोर मांडून त्यांचे राजकारण चाले. दांडेकरांना हाही विशेष ध्यानात ठेवावा लागेल.

गांधी अराजकवादी नव्हते. ब्रिटिश राज्यसत्ता जोवर राज्य चालविण्याची स्वतःची जबाबदारी झटकून टाकत नव्हती तोवर, एक ना एका अर्थाने, प्रजेला धीर देणारा, तिचे रक्षण करणारा, तिला आधार देणारा राजा जागेवर होता. काँग्रेसला डावलून भारत युद्धात सहभागी झाल्याची परस्पर घोषणा करताना, आम्ही येथे राजे आहोत हीच ब्रिटिशांची भूमिका होती. ही जबाबदारी एकतर्फी झटकून टाकण्याची भूमिका ब्रिटन अंगिकारत आहे याची, त्यांना समाधानकारक वाटेल इतकी, खात्री झाल्याक्षणी गांधींची भूमिका बदलली.

युद्धाचे पारडे जून १९४२ पावेतो फिरले होते हे १९४२ च्या जूनमध्ये स्पष्ट झाले होते का? युद्ध संपल्यावर, सर्व माहिती हाती आल्यावर, निवांतपणे विश्लेषण केल्यावर, मागे वळून पाहता ही गोष्ट स्पष्ट सांगता येणे वेगळे. तेव्हा, दांडेकरांचे विश्लेषण स्वीकारूनही, १९४२ मध्ये युद्ध खेळणाऱ्या नेत्यांची, लष्करी सेनाधिकाऱ्यांची व भारतातील वरिष्ठतम अधिकाऱ्यांच्या मनातली बोधना (पर्सेप्शन) काय होती, हा खरा प्रश्न आहे. गांधींना तर सर्व आघाड्यांवरील युद्धाची नेमकी स्थिती माहीतही नव्हती. त्यांच्यासमोरचा निर्णायक पुरावा जागेवरच्या हालचाली व त्यामागील योजना/भूमिका हाच होता.

अमेरिका युद्धात उतरली आहे, तेव्हा आता जर्मनी-जपान वगैरे 'ॲक्सिस' राष्ट्रांचा पराभव एक ना एक दिवस होणारच हे दूरदृष्टीने 'बघण्या'ची दृष्टी कोणा काँग्रेसी भारतीय नेत्यापाशी होती का? माहीत नाही. पण, समजा, तेवढी दूरदृष्टी व जाण होती. गांधींपुढचे आव्हान लगेचचेच होते; अंतिमतः जपानचा पराभव होण्यापर्यंत वाट पाहून चालणार नव्हते. राज्यसत्तेच्या अभावी जी पोकळी उत्पन्न होईल त्या स्थितीमध्ये लोकांनी कसे वागावे? काँग्रेसच्या हाती कारभार नव्हता, आणि तरी लोकांना मार्गदर्शन करण्याची जबाबदारी पार पाडणे हे काँग्रेसचे कर्तव्य होते. (काँग्रेसचे म्हणजे व्यवहारात गांधींचे.)

या प्रसंगीचे मूलतः वेगळ्या कोटीतले गांधींचे राजकारण ब्रिटिश राज्यकर्त्यांना समजले नाही तसे ते काँग्रेसमधील त्यांच्या बहुसंख्य सहकारी व अनुयायांनाही समजले नाही. हे अटळ होते, तेवढेच दुर्दैवी पण होते. ते समजणार नाही ही गोष्ट गांधींना कशी दिसली नाही? कारण, ती सूर्यप्रकाशाहूनही स्पष्ट गोष्ट होती, असे मनात येते. हा लढा ब्रिटिशांच्या युद्धप्रयत्नांच्या विरोधातला लढा नाही; तो त्यांच्या एकतर्फी जबाबदारी टाकून देण्याच्या नीतीविरुद्धचा लढा आहे; आणि त्याच वेळी तो 'स्वराज्या'चा (सेल्फ-गव्हर्नन्स) वस्तुपाठ पण आहे, ही गांधींची भूमिका. म्हणजे, एका अर्थी, संभाव्य आक्रमकाच्या (जपानच्या) पुढे लोकांनी निमूटपणे शरणागती पत्करू नये, वा त्याचे स्वागत करू नये, आत्मनिर्भर बनावे यासाठी हा लढा असावयाचा होता.

व्हाइसरॉय यांच्याशी कैदेतून झालेल्या गांधींच्या पत्र-व्यवहारावरून स्पष्ट होते की, एका उच्च नैतिक पातळीवरून अत्यंत सर्जनशील विधायक राजकारण करण्यासाठी टाकलेले पाऊल या व्हाइसरॉयना तरी नक्कीच कळेल असे गांधी गृहीत धरून चालले होते. तर, 'मी या युद्धात पूर्णपणे मनाने ब्रिटिशांच्या बाजूचा आहे' असे म्हणणारे गांधीही, अखेरीस, युद्ध ऐन हातघाईला आले असताना, कमालीच्या नाजुक क्षणी




मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

लढ्याची गोष्ट करतात हे पाहून, गांधीही विश्वासघात करणाराच अनैतिक राजकारणी निघाला, अशी व्हाइसरॉयची खात्री झाली. बहुसंख्य प्रशासक तर काँग्रेसच्या विरोधीच होते. व्हाइसरॉयची प्रतिक्रिया कमालीची आक्रमक, कडवट व धारदार झाली.

मागे वळून पाहताना, काँग्रेसमधील आपले ज्येष्ठ सहकारी, देशभरचे काँग्रेसचे लहानमोठे नेते व कार्यकर्ते आणि काँग्रेसजन यांच्यात व आपल्या भूमिकेत, समजुतीत, उदिष्टांमध्ये पडलेले अंतर लक्षात न घेण्याची 'हिमालयाएवढी घोडचूक' ('हिमालयन ब्लंडर') गांधींनी केली असे माझे मत झाले. गांधींच्या सगळ्या वक्तव्यांचा, 'करेंगे या मरेंगे' या भाषेचा काँग्रेस संघटनेला, काँग्रेसजनांना अर्थ वेगळाच लागत होता. या खेपेला गांधी त्यांचा नेहमीचा अहिंसेचा आग्रह धरीत नाहीत, आणि त्या दृष्टीने सोयीचे म्हणून ते लोकांनी स्वतःच 'आपण स्वतंत्र आहोत' या भूमिकेतून वागावे असे सांगत आहेत, असा अर्थ लावला गेला. हा अर्थ लावला जात आहे, आणि यामुळे लढा पुकारला जाईल तेव्हा घातपाती कृत्ये तरी करायला व ब्रिटिश राजवटीच्या नाकात दम आणायला आपण मोकळे आहोत, तेही गांधींच्या आशीर्वादाने, असे समजून भूमिगत होऊन लढा करण्याची तयारीही चालली आहे याकडे गांधींचे दुर्लक्ष कसे झाले, असेही मनात येते. गांधींच्या संमतीनेच व त्यांना कल्पना देऊनच ही तयारी चालली होती असा निष्कर्ष व्हाइसरॉयनी काढावा याबद्दल त्यांना दोषी कसे धरता येईल?

श्री. राजमोहन गांधी यांच्या वर उल्लेखिलेल्या पुस्तकाचे वाचन करीत असताना याचे स्पष्ट भान आले की ४२ च्या लढ्याने चित्र अनेक अंगांनी बदलले. १९३९ नंतर, काँग्रेस विरोधात गेल्यावर, ब्रिटिश राज्यकर्त्यांनी ठरवून, पद्धतशीरपणे मुस्लिम लीगचे महत्त्व वाढविले. जीनांचे एकमुखी सर्वाधिकारवादी नेतृत्व प्रस्थापित करण्यास मदत केली. (या दोन्ही गोष्टी आयेशा जलाल यांच्या *द सोल स्पोक्समन* आणि स्टॅन्ली वोलपर्ट यांच्या *जीना ऑफ पाकिस्तान* या दोन्ही पुस्तकांमधून अगदी स्पष्ट होतात.) ४२ च्या लढ्याने ही भूमिका आणखी पक्की झाली. ब्रिटिशांच्या पक्षपाती भूमिकेच्या अभावी पाकिस्तानचे राजकारण जीना यशस्वी करूच शकले नसते. ४२ च्या लढ्यामुळे अहिंसेवरील काँग्रेसजनांची (यात पुढारीही आले) निष्ठा शबल झाली, आणि हिंसेला मानस व वातावरण कमालीचे अनुकूल झाले. १९४६ नंतर जी हिंसा देशभर उसळली तिच्यामध्ये हिंदू लोकांनीही जागोजाग तेवढ्याच उत्साहाने व उन्मत्त होऊन सहभाग दिला. आणि यात काँग्रेसचे पुढारी व अनुयायी कित्येक ठिकाणी आघाडीवर होते अशी छाप मनावर उमटते. १९२० व ३० सालच्या लढ्यांच्या काळात अहिंसेची शिकवण काँग्रेसच्या चार आणे सभासदांपर्यंत पोचविण्यात गांधींना लक्षणीय यश प्राप्त झाले होते. ४२ च्या लढ्याच्या वेळी, गांधींचीच हिंसेला मान्यता आहे अशी समज पसरल्याने, ही शिकवण पुसली गेली का?

मग ४२च्या लढ्याची विधायक, गौरव करण्यासारखी सिद्धी कोणती? १९३९ ते १९४५ या काळात, सत्तेवर नसताना, काँग्रेसने मोठा लढा उभारून ब्रिटिश शासनाच्या दडपशाहीला आमंत्रित केले नसते तर १९४६ च्या निवडणुकीत काँग्रेसला लोकांची एवढी मते पडली असती का? काँग्रेसची शकलेपण कदाचित पडली असती, आणि शक्तिक्षय झाला असता. ४२साली लढा काँग्रेसच्या झेंड्याखाली उभारला गेला नसता तर, प्रक्षुब्ध तरुण पिढीने काँग्रेसच्या बाहेर पडून सशस्त्र उठाव केला असताही. रॉयिस्ट, कम्युनिस्ट, हिंदुमहासभावादी, लिबरल, आंबेडकरांचा पक्ष इत्यादी राजकीय संघटना सरकारच्या बाजूला होत्या. काँग्रेस हीपण आता राजनिष्ठ संघटना बनली असा ग्रह लोकांचा झाला असता. या साऱ्या शक्यता होत्या. देशाला स्वातंत्र्य मिळविण्यासाठी मरमिटण्यासाठी तयार असणारा एकमेव पक्ष म्हणून काँग्रेसची प्रतिमा जास्त उजळून निघाली. जेव्हा सत्तांतराच्या मार्गाने स्वातंत्र्य वहाल करण्याची वेळ आली तेव्हा ब्रिटिशांना मुस्लिम लीग व काँग्रेस यांच्या हातीच सत्ता देणे मग क्रमप्राप्त ठरले.

तरीदेखील असे मनात येते की, आपल्याला विश्वासात न घेता, आपली संमती न घेता भारत परस्पर युद्धात उतरल्याची घोषणा केल्याचा निषेध म्हणून सत्तात्याग केल्यानंतर, वैयक्तिक सत्याग्रहासारख्या कृतींद्वारा निषेध जारी राखत असतानाच, युद्ध जिंकण्याची निकड ध्यानात घेऊन अप्रत्यक्ष सहकाराची म्हणजे सक्रिय व्यत्यय न आणण्याची भूमिका सामंजस्य राखून राबविली असती तर पुढचा इतिहास काही वेगळा घडू शकला असता. वाऱ्यावर सोडून दिल्या जाणाऱ्या जनतेच्या संदर्भातले आपले कर्तव्य काँग्रेसने पार पाडावयाचे ही गरज व आव्हान उपस्थित झाल्यावर विलक्षण पेचात गांधी सापडले.

जर्मनीबरोबरील युद्धात दोस्त राष्ट्रांचा पराभव म्हणजे सुसंस्कृततेचा अंत, उन्मत्त रानटी क्रौर्याचा विजय ही धारणा



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई


अनुक्रमणिका

नेहरूंची इतकी पक्की होती की, युद्धप्रयत्नांमध्ये थोडाही व्यत्यय आणणाऱ्या 'लढ्या'ची कल्पना त्यांना सहन होईना. पूर्वेकडून जपानचे सैन्य आत घुसल्यास लोकांना वाऱ्यावर सोडून, प्रदेश वेचिराख करीत वायव्येच्या दिशेने माघार घ्यावयाची या वेजवावदार नीतीला प्रत्युत्तर द्यायलाच हवे, लोकांना मार्गदर्शन केलेच पाहिजे, हे कर्तव्य काँग्रेसने पार पाडायलाच हवे हे गांधींनी नेहरूंना पटवून दिले असा माझा तर्क होतो. पंडितजींचे मन वळविल्याखेरीज गांधींचा मार्ग खुला होत नव्हता. दुर्दैवाने, हा संवाद टिपला गेला नाही. सॉक्रेटिसच्या मृत्यूच्या प्रसंगी क्रिटो या त्याच्या चाहत्यावरोवर सॉक्रेटिसचा जो संवाद *(क्रिटो* नामक प्लेटोच्या संवाद-पुस्तकात) होतो त्या तोडीचा हा संवाद झाला असला पाहिजे.

केवळ नेहरूंचे मन वळवून पेच समाधानकारकपणे सोडविता येणार नव्हता. ब्रिटिश राज्यकर्त्यांसोवत – व्हाइसरॉय, वरिष्ठ सेनाधिकारी यांच्यासोवत – सामंजस्य ही पेंच समाधानकारकपणे सुटण्याची आवश्यक शर्त होती. आपण व्हाइसरॉयची भेट मागत आहोत, ही भेट होऊन बोलणे झाल्यावर नेमकी कृती कोणती करावी याबावतीत आपण काँग्रेसजनांना मार्गदर्शन करणार आहोत असे गांधींनी आठ ऑगस्टच्या सभेत सांगितलेही. गांधींना घाई नव्हती. मामला नाजूक होता. ही एक तारेवरची अवघड कसरत आहे याचे भान त्यांना होते.

पण 'करेंगे या मरेंगे', 'भारत छोडो' या घोषणांचा अर्थ व्हाइसरॉय व त्यांची सारी यंत्रणा, इंग्लंडमधील ब्रिटिश राज्यकर्ते यांना जो लागला तोच काँग्रेसच्या वहुसंख्य पुढाऱ्यांनाही लागला. हिंसा-अहिंसेचा विचार न करता, जमेल त्या मार्गाने व साधनांचा वापर करून घोर संकटात सापडलेल्या, जिवावर बेतलेल्या ब्रिटिशांविरुद्ध उठाव करून त्यांना शरण यायला लावायचे या उद्देशाने गांधींनी 'करेंगे या मरेंगे' ही हाक दिली आहे, हा दोघांनाही लागलेला अर्थ.

मग जे पुढे घडले ते घडणे अटळ होते. १८५७ च्या उठावाच्या वेळी केली तशी काँग्रेसजनांनी गोऱ्यांची जागोजाग कत्तल करण्याची गोष्ट केली नाही. जाळपोळीचे, घातपातीचे, प्रशासन हाती घेण्याचे कार्यक्रम जमेल तेथे पार पाडले. हे जागोजागचे उठाव निर्घृणपणे चिरडण्यात आले. पहिला हादरा सोडला तर, काही तुरळक अपवादात्मक छोटी क्षेत्रे सोडता उर्वरित भारतात ब्रिटिश राजवट निर्वेधपणे चालू राहिली. श्री. दांडेकरांनी सांगितल्याप्रमाणे, युद्धात दोस्त राष्ट्रांचे पारडे १९४२ च्या अखेरपर्यंत पुरेसे जड झाले. त्यामुळे, काँग्रेसशी युद्ध संपेपर्यंत वाटाघाटी करण्याचा प्रश्नच नव्हता.

वेगवेगळी कारणे एकत्र आल्याने १९४५ साली भारतातून सत्तांतर करून निघून जाण्याचा निर्णय इंग्रजांनी केला. सत्तांतर कोणाच्या हाती करावयाचा ही गोष्ट स्पष्ट होती. जिची सातत्याने पाचसहा वर्षे पुष्टी केली होती ती मुस्लिम लीग व तिचे सर्वेसर्वा पुढारी जीना आणि उर्वरित हिंदी लोकांच्या व प्रदेशाच्या संदर्भात काँग्रेस. पण काँग्रेसचे नाक कापायचे, गांधींची 'जागा' (की ते सर्व हिंदवासीयांचे नेते नाहीत) त्यांना दाखवून द्यायची यावद्दल ब्रिटिश राज्यकर्त्यांचा पुरता निर्धार होता. मुस्लिम लीगच्या 'डायरेक्ट ॲक्शन'च्या हिंसक चालीलाही अनेक ब्रिटिश प्रशासकांची अनुकूलता होती. काँग्रेस जेरीला येताना, नमताना, फाळणीला असलेला विरोध सोडून देताना पाहून त्यांना एक विशेष समाधान वाटत होते. जीना व मुस्लिम लीग यांना वापरून घेऊन, भारतातल्या इतर राजकीय पक्ष व गटांना वापरून घेऊन ब्रिटिश त्यांचे राजकारण खेळत होते. पाकिस्तान द्यायचे असे त्यांचे पक्के ठरले नव्हते. काँग्रेसला धडा शिकवायचा हे मात्र पक्के होते. जीना ब्रिटिशांच्या आडून त्यांचे राजकारण खेळत राहिले. या 'त्रिकोणी' राजकारणी खेळातल्या प्रत्येक पक्षाने, आपण इतर दोघांना कसे 'नमवले', असे म्हणण्याचे समाधान जरूर मिळविले. १९४६-४७ या दोन वर्षांतील दंगली, प्राणहानी, लाखोंचे स्थलांतर अधिक गेली पन्नास वर्षे भारत-पाकिस्तान, भारतातील हिंदू व मुस्लिम जनता यांचे परस्परांशी बिघडलेलेच राहिलेले संबंध, त्यामुळे वाया गेलेली शक्ती, धन, झालेली जीवितहानी या सगळ्याचा हिशेब मांडता लोकांचा पराभवच झाला असे म्हणायला लागते. गांधींचा तर दारुण पराभव झाला. मोठी मानहानी झाली.

एका ४२ च्या लढ्यामुळे ही शोकांतिका ओढवली असे म्हणणे गैर ठरेल. पण ४२च्या लढ्याचा यात नक्कीच एक वाटा होता. एक तर, गांधींच्या कल्पनेतला ४२ चा लढा झालाच नाही, आणि जो झाला त्याने ब्रिटिश राज्यकर्त्यांशी सामंजस्य व संवाद पार तुटला. गांधींच्या सत्याग्रहाच्या तत्त्वज्ञानात व कार्यपद्धतीत संवाद व सामंजस्य यांचे महत्त्व व कार्य कळीचे असते. ४२ च्या लढ्याने ना जीना व मुस्लिम जनता यांच्याशी मने जुळली ना ब्रिटिशांशी; ना लढ्यामधून काँग्रेसची व लोकांची सत्याग्रही निष्ठा शुद्धतर व पक्की

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

झाली. ज्या आपल्या अनुयायांनी हिंसक मार्गांचा अवलंब केला त्यांना गांधींनी सौम्य शब्दांत समज दिली; चुकीच्या वाटेने ते गेले, असेच ते म्हणाले. पण ही गोष्ट त्यांनी पित्याच्या भूमिकेतून पार पाडली. व्हाइसरॉयशी व ब्रिटिश शासनाशी झालेल्या पत्रव्यवहारावरून स्पष्ट होते की, गांधींनी ब्रिटिश राज्यकर्त्यांचे मात्र मोठ्या त्वेषाने खंडन केले, त्यांना दोषी धरले. (यात त्यांच्यावर अन्यायच गांधींकडून घडला.)

तात्पर्य, ४२ च्या लढ्याचे आपले आजचे शिष्टमान्य व जवळपास सर्वसंमत मूल्यमापन, सारासार विचार करता, मुळातून बरेच दुरुस्त करून घ्यायला हवे आहे. ४२ च्या लढ्यासाठी आपण निःशंकपणे पाठ थोपटून घेतो, छाती पुढे काढून बोलतो. अनेक तरुणांनी, अगदी किशोरवयीन मुलांनी अतुलनीय धैर्य व शौर्य प्रकट केले यात काही शंका नाही. ती सर्व मंडळी कौतुकास व आदरास पात्र आहेत. पण एकूण समग्र लढ्याचा व्यापक परिप्रेक्ष्यात विचार केला तर, गांधींना गजाआड केल्यावर लढा मुख्यतः काय साध्य करण्यासाठी होता हे पार विसरले गेले इतके तरी म्हणावयास हवेच.

सर्वसामान्य भारतीय जनता आणि गांधी यांच्यातले हे अंतर नव्हते ही महत्त्वाची गोष्ट ध्यानात घ्यायला हवी. काँग्रेसचे सर्व स्तरांवरचे नेते व कार्यकर्ते व स्वतःला काँग्रेसचे पाईक म्हणविणारे अनुयायी यांच्यात व गांधींमध्ये अंतर पडले होते. हे अंतर किती अनुल्लंघनीय होते ही गोष्ट १९४६-४८ या काळात स्पष्ट झाली.

दोष गांधींकडेही अर्थात जातोच. आपले उद्देश काय आहेत हे नीटपणे वरिष्ठ नेतृत्वापासून खालच्या स्तरावरील कार्यकर्त्यांपर्यंत पोचले आहेत की नाही याची खात्री त्यांनी करून घेतली नाही. दोस्त राष्ट्रांचा जय व्हावा या उद्दिष्टांशी मेळ राखून करावयाचा हा लढा असल्याने त्याचा रोख सरकारी यंत्रणा व कारभार उखडण्याचा नाही हे अधोरेखित व्हायला हवे तितके त्यांनी केले नाही. आपण स्वतंत्र आहोत असे समजून वागणे म्हणजे काय, उक्ती व कृतीमधून ते कसे प्रकट करावयाचे याची पुरेशी स्पष्टता त्यांनी 'भारत छोडो' ही घोषणा देण्याआधी केली नाही. १९३० साली कायदेभंग करून मीठ तयार करण्याचा कार्यक्रम घोषित केल्यावर अटक न केल्याने दांडीयात्रेच्या, सापेक्षतः, दीर्घ कालावधीत गांधींना लोकांचे परिणामकारकरित्या मार्गदर्शन करण्याची सवड देवदयेने मिळाली. या वेळी आपणास ही सवड मिळण्याची काहीपण शक्यता नाही, हे गांधींनी लक्षात घेऊन 'करेंगे या मरेंगे' छाप उत्तेजक व स्फोटक आदेश द्यावयास नको होता.

१९४२ साली उपस्थित झालेल्या परिस्थितीत लोकांना स्वाश्रयी व स्वतंत्र बनविणारा लढाऊ कार्यक्रम देण्याची गरज खरीच होती. ४२ चा लढाच करावयास नको होता असे माझे म्हणणे नाही, हे पुन्हा एकवार स्पष्ट केले पाहिजे.

*वसंत पळशीकर*



सदाशिव आठवले

**चार्वाक : इतिहास आणि तत्त्वज्ञान**

३ री आवृत्ती, डेमी, पृ. चोवीस + १०७, रु. ८०.००

**प्राज्ञपाठशाळामंडळ,** ३१५ गंगापुरी, वाई ४१२ ८०३ (जि. सातारा)









राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# मराठी साहित्यसमीक्षेचे चर्चाविश्व

**आ.ना. पेडणेकर**

बहुतेक लेखकांचे आस्थेचे आणि चिंतेचे विषय मराठीचे भवितव्य, साहित्य संमेलनांची जरुरी, इंग्रजीचे आक्रमण, समीक्षेचे स्वरूप, मराठीचे अध्यापन, मराठीची चर्चासत्रे, मुख्य प्रवाहापासून दूर जाणारे प्रवाह, वाङ्मयाभिरुची हे आहेत.

*साहित्याची भूमी* (यानंतर *साभू*) मध्ये मराठीच्या सद्यःस्थितीबद्दल तीव्र असमाधान, मराठी भाषा, वाङ्मय यांच्या भवितव्याबद्दल निराशेचा सूर व्यक्त होतो. *मराठी वाङ्मयः स्वातंत्र्योत्तर संदर्भ* (यानंतर *मवा*)च्या लेखकाच्या मते "सांस्कृतिक परिवर्तनाच्या इतिहासदत्त प्रेरणा स्वीकारताना त्याच्या इतिहासातील प्रेरणा ओळखण्याची कुवत मराठी समाजात आहे, याचा पुरावा स्वातंत्र्योत्तर मराठी साहित्याने निर्विवादपणे दिला आहे." "आता साधारण वाचकाची चांगल्या कसदार लेखनाची भूक वाढलेली आहे." (*सत्त्वाची भाषा* – यानंतर *सभा*) "मुळात आपली भाषा, संस्कृती यांचे प्रेम खऱ्या अर्थाने खेड्यापाड्यात शिल्लक आहे." (*सभा*) नवीन आव्हाने पेलण्याची क्षमता साहित्यक्षेत्रात विकसित होत आहे असे *मवा*च्या लेखकास वाटते. "ब्राह्मणादी जातींनी मराठी साहित्यात रंजनवाद पोसला. त्याची प्रतिक्रिया म्हणून पुढे आलेल्या दलित साहित्याने अंतरीची ओल घेऊन अनुभवाचे बोल दिले." *(दलित साहित्याची कोंडी* – यानंतर *दसाको*). "माणसाचे सम्यक् चित्रण करणारे साहित्य मराठीत दलित साहित्यच आहे." (*दसाको*) पठारेंचे निरीक्षण वेगळे आहे – "मुंबई-पुण्यात पारंपरिक आस्था-केंद्रे दुर्बळ होत असताना उर्वरित महाराष्ट्रात सारीकडे ही आस्था वाढताना दिसते."

श्री. पु. भागवतांच्या मते नवनिर्मितीला पोषक ठरणारी समीक्षा आज मराठीत फारशी नाही. पूर्वीही समाधानकारक स्वरूपात नव्हती. श्री. रा.ग. जाधवांच्या मते साहित्याप्रमाणेच मराठीत प्रतिसाद देणारा सर्वसाधारण वाचकवर्ग मराठी भाषिक समाजात आहे. मात्र समाजाभिमुख सुबोध समीक्षेची गरज आहे. मात्र रंगनाथ पठारे तक्रार करतात : "चांगली समीक्षा आणि चांगले समीक्षक आपल्या भाषिक संस्कृतीत आहेत ते संख्येने कमी आहेत. पण त्यांना उचित प्रतिष्ठा वाङ्मयीन संस्कृती, आपली प्रकाशक मंडळी देत नाहीत."

*मराठी साहित्य : प्रेरणा आणि स्वरूप* या, त्याच नावाच्या चर्चासत्रातील समीक्षा निबंधांचा समावेश असलेल्या पुस्तकाचे महत्त्व श्री.पुं.ना वाटते. असे ग्रंथ आणखी प्रसिद्ध व्हायला हवेत असे त्यांना वाटते. दिगंबर पाध्ये यांच्या १३३ पृष्ठांपैकी ३३ पृष्ठे या समीक्षेची समीक्षा करण्यात (चांगल्या अर्थाने) खर्ची पडली आहेत. त्यांनी एकंदरीत असमाधान व्यक्त केले आहे. काही लेखन आढावे, काही लेखन टिपणे, काही लेखन संपादकीय धोरणानुसार आहे. मत-भिन्नता ज्ञानक्षेत्रीय नसून आयडिऑलजिकल आहे. निर्मितीची गुणवत्ता आणि समाजरचना यांचा सरळ संबंध संपादकांनी जोडला त्याला वाङ्मयेतिहासात पुरावा नाही असे पाध्ये दाखवून देतात. सरदार वस्तुनिष्ठ पुराव्यावाचून बोलतात, त्यांची दृष्टी लोकरंजक आहे. चार-पाच निबंधांत पूर्वग्रह आणि आयडिऑलजी याचा प्रत्यय येतो. नेमाड्यांच्या कादंबरीवरील निबंधात पद्धतशीर अभ्यासापेक्षा वैयक्तिक पूर्वग्रह आणि आग्रह यांची दाट छाया आहे. जहागीरदार मध्यमवर्गाच्या अभिरुचीशी संबंध जोडतात, पण ती का, कशी बदलली हे शोधत नाहीत. अनियतकालिकांनी

---

१. *साहित्याची भूमी* – श्री.पु. भागवत, ग्रंथाली, मुंबई १९९७; रु. ५००/-. २. *सत्त्वाची भाषा* – रंगनाथ पठारे, शब्दालय प्रकाशन, श्रीरामपूर, १९९७; रु. १६०/-. ३. *साहित्य, समाज आणि संस्कृती* – दिगंबर पाध्ये, मुंबई विद्यापीठ आणि लोकवाङ्मयगृह, मुंबई, १९९८; रु. १५०/-. ४. *मराठी वाङ्मय-स्वातंत्र्योत्तर संदर्भ* – रा.ग. जाधव, प्रतिमा प्रकाशन, पुणे, १९९८; रु. १२०/-. ५. *मुस्लिम मराठी साहित्य* – महेबुब सय्यद, सावित्रीबाई फुले प्रकाशन, पुणे; रु. २०/-. ६. *दलित साहित्याची कोंडी* – दिनकर साळवे, सावित्रीबाई फुले प्रकाशन, पुणे; रु. १५/-.

लेखामध्ये वरील पुस्तकांचे 'साभू', 'सभा', 'साससं', 'मवा', 'मुमसा' आणि 'दसाको' असे संक्षिप्त उल्लेख केलेले आहेत.







अनुक्रमणिका

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

प्रभावी कार्य केले असे म्हणत, त्यांनी स्पृहणीय कार्य केले नाही असेही चंद्रकांत पाटील म्हणतात. अविनाश सप्रे यांच्या उपयोजित समीक्षेवरील निबंधात ज्ञानक्षेत्र म्हणून किमान शिस्त पाळावी लागते तिचा अभाव आहे. त्यात मनःपूत शेरेबाजी आहे. मिरजकर यांनी कवितेचा अव्यवस्थित स्वरूपात आढावा घेतला आहे. कवठेकरांचा दलित वाङ्मयावरील निबंध एका बाजूने आयडिऑलजिकल विधानांनी भरलेला तर दुसऱ्या बाजूने परस्परविरोधी प्रतिक्रियांनी भरलेला आहे. सत्यान्वेषण हा चर्चासत्राचा उद्देश हरवतो. चर्चासत्रे केवळ उपचार ठरतात हा पाध्येंनी साधार निष्कर्ष दिलेला आहे!

अलीकडील काही वर्षांत दलित आत्मकथने, ग्रामीण पार्श्वभूमीवरील साहित्य देशीपणाची एक नवी जाणीव घेऊन प्रकट होत आहे याचे पठारे स्वागत करतात. त्याचबरोबर, मध्यमवर्ग चतुराईने त्याच्याशी जमवून घेऊन प्रत्येक गोष्टीचे तत्त्वज्ञान करतो हेही निरीक्षण नोंदवतात. "मराठीतून ग्रामीण आणि दलित साहित्य वगळले तर काय देशीपण उरते हे नेमाडेंनाच ठाऊक!" असा मुद्दा दिनकर साळवे उपस्थित करतात. "आंबेडकरवादाविरुद्ध असलेल्या दलितांतील प्रवृत्ती तसेच ग्रामीण साहित्य चळवळीचा आधार घेऊन परंपरागत सरंजामी व्यवस्थेच्या ऱ्हासाची दुःखे गाणाऱ्या प्रवृत्ती, फुलेवादाशी नाळ तोडणे" या धोक्यांकडे *सत्त्वाची भाषा* मधील एक लेख लक्ष वेधतो.

*रणांगण* कादंबरीची उंची गाठण्याचं यश कुणाही मराठी कादंबरीकाराच्यां प्रतिभेला साधलेलं नाही. हे श्री.पुं.चं मत रंगनाथ पठारेंना मान्य नसावं. त्यांना *स्मृतिचित्रे*, *धग*, *कोसला* या आधुनिक काळातील तीन श्रेष्ठ कलाकृती वाटतात. किरण नगरकरांची *सात सक्कं त्रेचाळीस*ही त्यांच्याजवळ नेतात. "श्रेष्ठत्वाचे निकष मानून अर्वाचीन समीक्षकांनी ज्यां दोन-तीन पुस्तकांना अजरामर वगैरे ठरवले ते आता त्यांना कितपत वाटते हे पाहिले पाहिजे" असेही ते म्हणतात.

एका संमेलनाच्या समारोपाच्या प्रसंगी श्री.पु. "बहुसंख्य श्रोत्यांच्या मनात मराठी भाषा आणि साहित्य यांचे निर्विकल्प प्रेम उत्तेजित झाले असेल" अशी आशा करतात. पठारे यांच्या मते, "अशा उत्सवांतून साहित्य/संस्कृती या गोष्टी पुढे जाण्याच्या दृष्टीने काही घडत नाही..... यातून जे मिळते ते फारच अल्प असते... दुय्यम-तिय्यम श्रेणीचे लोकही अध्यक्ष म्हणून निवडून येतात.... लेखकांना भेटून काय उपयोग? तो वाचला जाणे महत्त्वाचे." पठारे छोट्या संमेलनांचा एक धोका दाखवतात – "वारक्या व्यूहात लिहिणाऱ्याला जी अवाजवी प्रतिष्ठा मिळते तिने वव्हंशी त्याचे पंख छाटले जातात". प्रा. दिगंबर पाध्ये हे 'समाजातील साहित्य-संस्कृती हा पूल भक्कम नसल्याचा' योग्य इशारा देतात.

ग्रामीण, दलित इत्यादी मुख्यतः सामाजिक परिवर्तनाच्या चळवळींतून, मोजक्या का होईना, चांगल्या साहित्यकृती जन्माला आल्या हे स्वागतार्ह आहे असे सांगून श्री.पु. म्हणतात, "या चळवळींनी उभ्या केलेल्या वैचारिक भूमिकांतून विविध रंगछटांचे देशीवाद निर्माण झाले ही गोष्ट मराठी साहित्याला आणि समीक्षेला हितावह ठरेल की नाही कोण जाणे." दिनकर साळवे दलित साहित्याच्या समर्थनार्थ म्हणतात – "आमच्या लेखकांच्या जातियतेचा तट इतका अभेद्य असतो की, आपल्या जागेवरून समग्र समाजजीवनाचे यथार्थ दर्शन त्याला कधी घेताच यायचे नाही... ब्राह्मणादी जातींनी मराठी साहित्यविश्वात रंजनवाद पोसला त्याची प्रतिक्रिया म्हणून दलित साहित्याने अंतरीची ओल घेऊन अनुभवाचे बोल दिले." (*दसाकों*)

रा.ग. जाधवांच्या मते ग्रामीण साहित्याच्या चळवळीला ग्रामीणता आणि परिवर्तन यांचे नेमके आशय स्पष्ट झालेले नाहीत. "विद्वेषाचे राजकारण, ग्रामीण मुसलमानांना बसलेले चटके, मंडल आयोगाने आलेले बहुजन समाजातील भान, यांतून मुस्लिम साहित्य उभे राहिले. मुस्लिम लेखन जगण्याचे प्रश्न घेऊन उभे राहिले. कनिष्ठ मुस्लीम जातीय स्वभाषेतून शोध घेऊ लागले." महेबूब सय्यद यांनी अशी मीमांसा केली आहे. रंगनाथ पठारे चळवळीकडे असे पाहतात – "लेखन ही निरुद्योगी माणसाने करायची गोष्ट नसून सततच्या उद्योगाचा, चळवळीचा, जाणीव व्यापक करण्याच्या प्रक्रियेचा भाग झाला. लेखकाला व्यापक सामाजिक अर्थ प्राप्त झाला." "सगळ्या प्रवाहांची पुनर्घटना होऊन अंती काही सशक्त असे चांगले उभे राहील," अशी पठारेंना आशा नाही. ते आंबेडकरवादी आणि ग्रामीण साहित्य चळवळीतील धोके दाखवतात. "मात्र अनुभवाची ताकद त्याला (लेखकाला) जातिमर्यादेबाहेर खेचते हे विसरू नये" असे सांगतात.

'उद्घाटनाच्या निमित्ताने' या भाषणात श्री.पुं.नी एका गंभीर धोक्याकडे लक्ष वळवले आहे. मराठी वाङ्मय आणि संस्कृती यांना वैचारिक असहिष्णुतेचा धोका आहे. जे ज्ञानाच्या क्षेत्रातले विषय असतात त्याचा ज्ञानसाधनांच्या साह्यानेच







अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

निर्णय घ्यायला हवा. समाजातील असहिष्णू आणि वास्तव–पराङ्मुख वातावरणात कलावंताला स्थान नसेल, श्रेष्ठ कलाकृती दुर्घट होतील हा इशारा देऊन ते विचार, आविष्कार, आस्वाद यांच्या स्वातंत्र्याची पथ्यंही सांगतात. हे सर्वच भाषण मोलाचं आहे. पठारेही निराळ्या भाषेत हेच सांगतात – "सांस्कृतिक आक्रमणात आपले स्वत्व टिकवून धरण्याची धमक प्रकट करण्याची आपली जबाबदारी लेखकाने उचलली पाहिजे..... वाङ्मयीन निर्मिती ही जीवनधारणेपासून अलग गोष्ट नाही.... इतिहास नीट समजावून घेऊन वर्तमानाचे आकलन सुलभतेने करता येते. आपण कशासाठी काय करीत आहोत वा कोण आपला कशासाठी वापर करीत आहे हे समजावून घेतले पाहिजे.... लेखकाने एक प्रकारची प्रखर नैतिकता घेऊन जगले पाहिजे." ('संमेलन संस्कृती' – *सभा*) श्री. रा.ग. जाधवांच्या *मराठी साहित्य : स्वातंत्र्योत्तर संदर्भा*त आविष्कार-स्वातंत्र्याला जागा दिलेली नाही याचे आश्चर्य वाटते. दिगंबर पाध्येंनी साहित्यसंस्कृती दुबळी राहण्याचे नेमके कारण सांगितले आहे – "ज्या समाजात साहित्याकडे कसले तरी साधन म्हणून पाहण्याची दृष्टी प्रबळ असते त्या समाजात साहित्य आणि साहित्यिक यांना महत्त्वाचे स्थान असणे तार्किकदृष्ट्या संभवत नाही. अशा समाजात लेखकाचे स्वातंत्र्य वारंवार धोक्यात येऊ शकते. म्हणून ही वृत्ती हा साहित्यसंस्कृतीचा दुबळेपणा ठरतो."

श्री.पुं.च्या मते 'समीक्षा व्यापारा'त "माझा आस्वादाचा अनुभव जसा प्राथमिक तसा सार्वभौम मोलाचा आहे.... कोणताही साहित्यसिद्धान्त वैध असला तरी पर्याप्त नव्हे... कलाकृतीचा प्रत्यय सिद्धान्तावर दोनचार अंगुळं वर उरला तर त्याला शरण जावं." डॉ. रा.भा. पाटणकरांनी आस्वाद-लेखनावर घेतलेले आक्षेप श्री.पुं. नी लक्षात घेतले नसावेत. रा.ग. जाधवांना 'साहित्योत्सुक बहुजनांना विशेषज्ञाची समीक्षा कळावी इतकी सुबोध हवी... समाज हा समीक्षेतूनच साहित्याचे संगोपन करतो" असे वाटते. दिगंबर पाध्ये यांना "कलावादी म्हणवून घेणारी बरीचशी समीक्षा व्यक्तिगत प्रतिक्रियांवर भार टाकून संदिग्ध होत राहते" याचे दुःख आहे. "पाश्चात्त्य पद्धतीचे अनुकरण करून साहित्याचा सामाजिक अन्वय लावण्याची जबाबदारी पार पाडावी लागते." तेही घडत नाही. याचेही त्यांना दुःख आहे.

रंगनाथ पठारे यांनी "वर्षानुवर्षे (समीक्षेत) मौलिक काम करणारे दुर्लक्षित राहतात" याची खंत व्यक्त केली आहे.

ब्राह्मणी मराठी साहित्यिक समृद्ध दलित साहित्याला साहित्य न मानता 'सोशल डॉक्युमेंट्स' मानतात यात नवल ते काय? असा प्रश्न साळवे विचारतात. "रावसाहेब कसबे सोडता आंबेडकरवादाची तात्त्विक मांडणी करण्याचा गंभीर प्रयत्न कुणी केला नाही. इतर समीक्षक एकमेकांची कार्बन कॉपी करत असावेत" असे साळवे यांचे मत आहे.

आत्मकेंद्रित मराठी सारस्वताने मुस्लिम मराठी साहित्याला वगळ दिली अशी सय्यदांची तक्रार आहे.

*सत्त्वाची भाषा* हा ग्रंथ वाङ्मयनिर्मिती, निर्मितिप्रक्रिया, भाषांतर-प्रक्रिया या दृष्टीने महत्त्वाचा आहे. सांस्कृतिक आक्रमणात आपले स्वत्व टिकवावे; लेखननिर्मितीत जीवनविषयक भूमिका, आकलन महत्त्वाचे. लेखकाने एक प्रखर नैतिकता घेऊन जगले पाहिजे. वारक्या व्यूहात (चळवळीत) मिळणाऱ्या अवाजवी प्रतिष्ठेने लिहिणाऱ्याचे पंख छाटले जातात. आपण क्षुद्र भाषिक समूह नाही आहोत, हा दिलासा पठारे देतात. ('मराठी मरणाच्या पंथास लागली आहे' ह्या संदर्भात हे महत्त्वाचे!). ग्रामीण-दलित साहित्य चळवळीचे धोके दाखवतात. मराठा समाजातील दोषांवर परखडपणे टीका करतात. स्त्री- पुरुष नात्याची मर्मग्राही चिकित्सा करतात. भाषांतर एका अर्थाने सांस्कृतिक अनुवाद असतो. आपले भाषिक पर्यावरण टिकवणे नेहमी आवश्यक आहे.

'दृष्टिक्षेप आणि दृष्टिकोन – तीन मुलाखती' यातून पठारे यांनी आपले कादंबरी- लेखन तसेच कथालेखन याविषयी जी निरीक्षणे, मते, अनुभव मांडले आहेत ती वाचकांनाच नव्हे तर लेखकांना, समीक्षकांनाही उपयोगाची आहेत. आपल्या लेखनाबद्दल, लेखनतंत्राबद्दल एखादा लेखक गंभीरपणे चिंतन करतो, आत्मविश्वासाने बोलतो हे दृश्य मराठी साहित्यात विरळ आहे. या सर्व लेखनात आढावा नाही, जागोजाग मर्मदृष्टी आहे. कलाकाराला झालेला साक्षात्कार, आलेल्या अडचणी यांचा विचार आहे. त्याच्या 'वादग्रस्त' 'वैकुंठीची माती' यावरील चर्चाही उद्बोधक आहे.

*साहित्याची भूमी*त मर्ढेकरांची कविता, गाडगीळांच्या कथा, पु.लं.चा विनोद यांचे मर्मग्राही विवेचन आहे. मराठी समीक्षा, शिक्षणक्षेत्रातील मराठी, मराठीवरील संकट, साहित्याचे स्वरूप यांवर मुक्त चिंतन आहे. आठ-नऊ साहित्यिकांची व्यक्तिमत्त्वे



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

चित्रित केली आहेत. त्याचा साहित्याच्या आकलनास फारसा उपयोग होणार नाही. संपादक आणि प्रकाशक या नात्याने काही अनुभव आहेत. “आपण कधी वाङ्मयीन कर्तव्य योग्य वजावले नसेल तर त्यामागे जातीय पूर्वग्रह खात्रीने नव्हता, वाङ्मयीन जाणिवेची वधिरता आणि अ-दूरदृष्टी असली पाहिजे” असे सांगितले आहे.

*साहित्य, समाज आणि संस्कृती* यात साहित्य, समाज आणि संस्कृती यांच्या परस्परसंवंधांविषयी चार तात्त्विक लेख आहेत. साहित्याच्या संदर्भात विविध प्रश्नांची जाणीव त्यांनी समर्थपणे करून दिलेली आहे. “साहित्याचा कला म्हणून येणारा अनुभव मला मोलाचा वाटतो पण त्याचवरोवर साहित्याचे सामाजिक, सांस्कृतिक स्वरूपही मला महत्त्वाचे वाटते” या धारणेचा परिणाम लेखनावर असल्याचे ते सांगतात.

दुसऱ्या भागात उपयोजन आहे. ‘पु.भा. भावे यांची जीवनदृष्टी आणि कथा’ यात भाव्यांच्या कथांची समीक्षा आहे. भाव्यांच्या अनुभवविश्वाला मर्यादा आहेत; त्यांच्या शैलीची वैशिष्ट्ये त्यांच्या मर्यादाही ठरतात. भावे यांचे कथालेखन नव्या संस्कृतीला आपल्या जाणिवांमध्ये सामावून घेण्याचा प्रयत्न आहे. त्यांचे मन शुद्ध सनातनी नसले तरी ते आधुनिक म्हणणे कठीण आहे असे ते सांगतात. पारंपरिक स्त्रीविपयक दृष्टिकोनातील अनुदारता त्यांच्या दृष्टिकोनात आहे. पुरुषी आक्रमकता त्यांच्या नायकांचा विशेष आहे. त्यांचे मन नैतिक प्रश्नांवावत दुभंगलेले आहे; सृजनशील असून विलक्षण आग्रही आहे. ‘किल्मिष’ कथेचे मार्मिक परीक्षण त्यांनी केले आहे. कथेतून केवळ वास्तव मांडण्याऐवजी ते स्वप्ने सुचवतात.

‘वरेरकरांची जीवनदृष्टी’ हा लेखही महत्त्वाचा आहे. प्रचाराच्या हेतूने वरेरकर लेखनाकडे वळले. पलायनवृत्तीच्या काळात वास्तववादाचे निशाण त्यांनी फडकवत ठेवले. धर्म, रूढींतील घातक समजुती व व्यवहार यांवद्दल तसेच सर्वप्रकारच्या विषमतेवद्दल त्यांना तीव्र संताप आहे. हिंदू समाजातील तथाकथित उच्चवर्णीय पांढरपेशा स्त्रियांचे जीवन इतर स्त्रियांपेक्षा कसे गुलामगिरीचे आहे हे ते दाखवतात. काही वेळा मताच्या समर्थनार्थ ते जीवनाकडे केवळ तार्किक दृष्टीने पाहतात. अन्यायाची तार्किकदृष्ट्या होणारी जाणीव ही त्यांच्या जीवनदृष्टीची मौलिकता. मात्र मानवी मन आणि माणसाच्या परस्पर संवंधांची गुंतागुंत यातून न्याय-अन्यायाच्या कल्पना उलगडून पाहण्यात ते अपयशी होतात. व्यक्तिगत ग्रह-पूर्वग्रहामुळे सलग सुसंगत जीवनदृष्टीचा प्रत्यय येत नाही. तर्ककर्कशतेच्या वळावर सुधारणांचा पुरस्कार करतात. प्रश्नाच्या मुळाशी जाणारा, शाश्वततेचे दर्शन घडवणारा तत्त्वचिंतक त्यांच्यात नव्हता.

वरेरकर आणि भावे यांच्या कादंवऱ्या व कथा यांचे समीक्षण त्यांनी साधार केले आहे. त्यांच्या निष्कर्षांशी सहमत न होणे कठीण आहे. वाङ्मयाच्या अभिरुचीचा आढावा घेताना, रा.श्री. जोग यांच्याकडे ऐतिहासिक, सामाजिक दृष्टिकोनाचा अभाव आहे; याचे कारण वाङ्मयाकडे कला म्हणून पाहावे याकडे झुकणारे त्यांचे मत, असे पाध्ये दाखवून देतात. *मराठी साहित्य : प्रेरणा व स्वरूप* ग्रंथातील जवळजवळ सर्व समीक्षालेखांवावत पाध्ये यांनी असमाधान व्यक्त केले आहे. पुरेशा उदाहरणांनी त्यांनी त्यांतील विसंगती, परस्परविरोधी विधाने, व्यक्तिगत प्रतिक्रिया, आढावे, शिस्तीचा अभाव इ. दोषांवर नेमके वोट ठेवले आहे.

श्री. रा.ग. जाधव यांच्या *मराठी वाङ्मयः स्वातंत्र्योत्तर संदर्भ* या ग्रंथात स्वातंत्र्योत्तर संदर्भाचे अनेक अर्थ आहेत, तरी त्याच्या आधारे थेट केलेली समीक्षा नाही, हे त्यांनीच प्रारंभी सांगितले आहे. सौंदर्यशास्त्र, लघुकथा, दलित साहित्य, सर्जनशील आत्मचरित्रे, प्रयोगशील नाटके यांचा अर्धशतकातील गौरवास्पद गोष्टी म्हणून जाधव उल्लेख करतात. मराठीत मौलिक समीक्षा नाही, मात्र या काळात नवे अभ्यासविपय आले – उदा. अस्तित्ववाद, देशीवाद, प्रगत भापाविज्ञान, स्त्रीवाद, शैलीवाद इ. –, सौंदर्यशास्त्राची मांडणी व मीमांसा झाली, पण ललितकृतीची आस्वादक आणि तात्त्विक समीक्षा कमी झाली असे ते म्हणतात.

पहिल्या प्रकरणात सांस्कृतिक चळवळींचा आढावा आहे. मराठी कलापरंपरेचा अभ्यास केवळ ऐतिहासिक दृष्टीने नव्हे तर तिच्यातील खास मराठी कलात्मक जाणिवांच्या दृष्टीने होणे इष्ट आहे असे त्यांचे म्हणणे. एका प्रकरणात चरित्र-वाङ्मयाचा आढावा आहे. वोधवादी, समग्रलक्ष्यी, व्रतस्थ, जीवन-सौंदर्यवादी, द्वंद्वात्मक भूमिकेतील साहित्य, व्यक्तिजीवनाची अनुभवचित्रे असे कप्पे ते पाडतात. ते फारसे समाधानकारक नाहीत. ‘जैविक-सांस्कृतिक पर्यावरणाचे नवे संवेदनपर्व’ या प्रकरणात पर्यावरणीय संवेदनाच्या संदर्भात काही साहित्यकृतींचा परामर्श घेतला आहे. (*ऋतुचक्र*, *सत्तांतर*, *मी जेनी*, *माऊली*, गोखले यांच्या काही कथा) समकालीन संदर्भात ते साहित्याची अभिरुची तपासतात. रा.श्री. जोगांच्या पुस्तकाशी याची तुलना

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अनुक्रमणिका

करता येईल. "माणूस, साहित्य, समाज याचे अलगसे वा एकत्रित मूल्यभानच साहित्यसृष्टीत आढळत नाही" असे ते म्हणतात. 'साहित्यप्रकारा'त मौखिक परंपरेतील साहित्यप्रकार सांगतात. साहित्यबाह्य चौकट मांडतात. भारतीय परिप्रेक्ष्याचा विचार करतात. पॅरालिटरेचर (साहित्यवजा/निमसाहित्यिक) प्रकाराची दखल घेणे कसे आवश्यक आहे ते सांगतात. शेवटचे प्रकरण कोशरचनेवर आहे. त्याचे प्रकार, उद्दिष्टे, क्षेत्र, सरहद्दी सांगून वेगवेगळ्या कोशात एकच नोंद कशी मांडली जाते, ते ते उद्दिष्ट कसे साधले जाते ते दाखवतात. हा भाग उद्‌बोधक आहे.

*दलित साहित्याची कोंडी* पुस्तिका दलित वाङ्मयाचा उगम कोणत्या परिस्थितीत झाला ते सांगते. ग्रामीण साहित्याने फुलेवादाशी आपली नाळ जोडली नसल्याचा खेद प्रकट करते. पारंपरिक मराठी साहित्य ब्राह्मणी असल्याचे दाखवून देते. दलिताचा लढा केवळ एका जातीचा एका आघाडीवरचा नाही याचे भान दलितांना येत आहे असे आश्वासन देते. अण्णाभाऊंच्या कथेत मार्क्सवादी दृष्टीचे सांस्कृतिक प्रक्षेपण अधिक प्रभावी व्हायला हवे होते असे मानते. दलित आणि आंबेडकरवादी साहित्यातील भेद सांगते. दलित साहित्यासाठी नव्या सौंदर्यशास्त्राची मागणी करते.

*मुस्लिम मराठी साहित्य* ही मेहेबूब सय्यद यांची पुस्तिका आहे. त्यांना मराठी साहित्यात मुस्लिमांचे विकृत चित्रण आढळते. त्यामागील कारणमीमांसा त्यांनी केलेली आहे. मुस्लिमांमध्ये असुरक्षिततेची भावना वाढीस लागण्याची राजकीय कारणे सय्यद देतात. आज मुस्लिम जगण्याचे प्रश्न घेऊन उभे आहेत. त्यांच्या दृष्टीने धर्मकारण दुय्यम आहे. दारिद्र्य, विषमता, अज्ञान, भेदभाव इ. प्रश्न घेऊन मुस्लिम लेखक उभे राहत आहेत. मंडल आयोगाने मुस्लिमांनाही आत्मभान आले. मुस्लिम लेखकांनी ब्राह्मणवादाच्या विरोधात, प्रस्थापितांच्या विरोधात, मुस्लिम मानसिकतेचा वेध घेऊन लिहावे, त्यांचे ध्येय समग्र मानवमुक्ती असले पाहिजे, असे सय्यद सांगतात. मुस्लिमांना एकाच वेळी हिंदू आणि मुस्लिम अशा दोन्ही अभिजनांवरोबर लढाई करायची आहे. त्यांनी फुले- आंबेडकरवादी जीवनदृष्टी स्वीकारावी असे सय्यद यांना वाटते. वर्गजातिअंताचे तत्त्वज्ञानच त्यांना स्वीकारावे लागेल असे ते सांगतात.



---

**लेखक-परिचय**

❖ **गो.पु. देशपांडे** : जवाहरलाल नेहरू विश्वविद्यालय, नवी दिल्ली, येथे स्कूल ऑफ इंटरनॅशनल स्टडीज मध्ये 'चायनीज स्टडीज' या विषयाचे प्राध्यापक; *उध्वस्त धर्मशाळा* व इतर नाटकांचे कर्ते; चीनमधील राजकीय घडामोडी, भारतातील सामाजिक-वैचारिक, संस्कृती-साहित्य-कला क्षेत्रांतील घडामोडी यांचे अभ्यासक व समीक्षक; नियतकालिके-वृत्तपत्रे यांमधून स्तंभलेखन. **पत्ता** : ११५, उत्तराखंड, जवाहरलाल नेहरू विश्वविद्यालय, नवी दिल्ली ११० ०६७.

❖ **चिं.मो. पंडित** : (परिचय लेखाच्या आरंभी) **पत्ता** : ६ 'सुरुचि', संत जनाबाई पथ, विलेपार्ले (पूर्व), मुंबई ४४० ०५७.

❖ **दे.अ. दाभोलकर** : अर्थशास्त्राचे निवृत्त प्राध्यापक; आर्थिक विकास, गांधी विचार, शिक्षण, समाज परिवर्तन इत्यादी विषयांवर मौलिक चिंतन; पुणे विद्यापीठ व इंडियन इन्स्टिट्यूट ऑफ एज्युकेशन, पुणे, यांचे भूतपूर्व संचालक; *आर्थिक विकासाचा प्रश्न, लोकशाही समाजवाद, शिक्षणाची समान संधी* इत्यादी पुस्तिका व नियतकालिकांमधून अनेकविध विषयांवर लेखन; क्रियाशील विचारवंत; **पत्ता** : ४३ गुरुकृपा हाऊसिंग सोसायटी, गोडोली, सातारा.

❖ **प्रभाकर नानावटी** : केंद्र सरकारच्या आर्मामेंट रिसर्च प्रयोगशाळेत नोकरी; बुद्धिप्रामाण्यवादी, विज्ञाननिष्ठ दृष्टिकोनामधून राजकीय-सामाजिक घडामोडींविषयी चिंतन व वृत्तपत्रीय लेखन. **पत्ता** : ई६/४ आर्मामेंट कॉलनी, औंध, पुणे ४११ ००७.

❖ **आ.ना. पेडणेकर** : इंग्रजीचे निवृत्त प्राध्यापक; लघुकथाकार, कवी व समीक्षक; टॉलस्टॉय यांच्या *वॉर अँड पीस* या अक्षर वाङ्मयकृतीचे संक्षिप्त भाषांतर *युद्ध आणि शांती* प्रसिद्ध. **पत्ता** : ६ अनुपमप्रभा, अमरसी रोड, मालाड (प.), मुंबई ४०० ०६४.

❖ **अनिल झणकर** : चित्रपट या कलाप्रकाराचा विशेष अभ्यास. चित्रपट, अन्य कला व संस्कृती या विषयांवर लेखन. **पत्ता** : ४३३/१८, सारस्वत वसाहत, सोमवार पेठ, पुणे ४११ ००१.

अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# अक्षरवेध

**गंगाधर बाळकृष्ण सरदार – व्यक्ती आणि कार्य;** हेमंत विष्णू इनामदार
राज्य मराठी विकास संस्था, मुंबई, १९९८; रु. ६०.००.

राज्य मराठी विकास संस्था प्रकाशित करीत असलेल्या 'अर्वाचीन महाराष्ट्राची जडणघडण' या मालेतील हे क्रमांक तीनचे प्रकाशन आहे. या मालेचे उद्दिष्ट संपादकांनी (सरोजिनी वैद्य व वसंत आवाजी डहाके यांनी) 'जडणघडण मालिकेविषयी' या आपल्या प्रारंभीच्या निवेदनात स्पष्ट केले आहे. ते असे आहे. "ज्यांच्या कर्तृत्वातून, प्रयत्नांतून आणि प्रभावातून आजचा महाराष्ट्र सामाजिक, सांस्कृतिक संदर्भात आकाराला आला आहे अशा व्यक्ती, संस्था आणि विचारप्रवाह यांचा परिचय या मालेतून सर्वसामान्य शिक्षित वाचकांना करून दिला जाईल."

मालेचे हे उद्दिष्ट डॉ. इनामदार यांनी या छोट्या पुस्तकात कसोशीने साध्य करण्याचा प्रयत्न केला आहे, आणि त्यात ते जवळजवळ पूर्णपणे यशस्वी झाले आहेत, हे मोकळेपणाने मान्य करावयास हवे. या विषयावर मर्यादित पृष्ठसंख्येत लिहिणे किती दुष्कर आहे याचा मी नुकताच अनुभव घेतलेला असल्यामुळे तर हे मला विशेषच जाणवते.

डॉ. इनामदार हे प्रा. गं.बा. सरदार यांचे दीर्घकाल निकटचे सहकारी : प्रा. सरदार यांच्याविषयीचा त्यांच्या अंतःकरणातील आदर त्यांनी त्यांच्या पावन आणि प्रेरक स्मृतीला केलेल्या सादर समर्पणावरून व्यक्त झालेला आहे. दोघेही समान आंतरिक सात्त्विक प्रकृतीचे, सौम्य प्रवृत्तीचे परंतु आपापल्या भूमिकांविषयी पक्के. आपापल्या भूमिकांविषयी ठाम असलेल्या या दोघा सहकाऱ्यांमध्ये वैचारिक वाद-संवाद कसा व कोणत्या मुद्द्यांवर होत असे या अंगाने या पुस्तकाच्या वाचनात मला रस होता. सविस्तर विवेचनाखेरीज या चर्चेत शिरणे उपयोगी होण्यासारखे नसते, ही अडचण डॉ. इनामदारांना जाणवली असावी. शब्दमर्यादा पाळून प्राथमिक परिचयपर पुस्तक लिहावयाचे असल्याने त्याबद्दल आक्षेप घेण्यासारखे काही नाही. परंतु परस्परांशी झालेल्या चर्चेत हा विषय निघाला असल्यास डॉ. इनामदार यांच्याकडून त्या विषयी ऐकावयास आवडेल. त्याविषयावर चर्चा झालीच नसल्यास तसे कळण्यातही मला रस आहे.

आरंभी सरदारांचे जीवनवृत्त थोडक्यात देऊन त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचे चित्र रेखाटले आहे. "साधी राहणी आणि उच्च विचारसरणी" त्यांच्या रक्तातच होती." "ज्ञानाचे लोण सामाजिक परिस्थितीचा अनुबंध राखून लोकमानसापर्यंत पोचविणे (त्यांनी) महत्त्वाचे मानले." "ज्या लोकांसाठी ज्ञानाचा प्रसार करावयाचा, त्यांच्याबद्दल दृढ श्रद्धा हवी, अशी त्यांची धारणा होती. त्यामुळे त्यांच्या लेखनात सात्त्विक संयम आढळतो." "विद्वत्तेला विनयाची जोड हवी, तसेच विद्वान हा निःस्पृह असला पाहिजे. सरदारांच्या अंगी हे दोन्ही गुण होते." प्रा. इनामदारांनी रेखाटलेले हे चित्र सरदारांना ओळखणाऱ्या सर्वांना मान्य होईल.

*अर्वाचीन मराठी गद्याची पूर्वपीठिका* (१९३७), *महाराष्ट्राचे उपेक्षित मानकरी* (१९४१), *संत वाङ्मयाची सामाजिक फलश्रुती* (१९५०), *ज्ञानेश्वरांची जीवननिष्ठा* (१९७१), *न्या. रानडेप्रणीत सामाजिक सुधारणेची तत्त्वमीमांसा* (१९७३), *आगरकरांचा सामाजिक विचार* (१९७५), *महात्मा फुले : विचार आणि कार्य* (१९८१) या सरदारांच्या प्रमुख ग्रंथांतील विवेचनाचा थोडक्यात परिचय करून देण्याचे काम साक्षेपाने पार पाडीत असतानाच प्रा. इनामदार यांनी आपले असमाधान, मतभेद नोंदवीत प्रश्नही उपस्थित केले आहेत. सरदारांचे अन्य स्फुट लेख, पुस्तिका, व्याख्यानांच्या पुस्तिका यांचाही परामर्श त्यांनी घेतला आहे. सरदारांच्या वैचारिक-सामाजिक आस्थेचे, चिंतनाचे व प्रबोधनाचे क्षेत्र किती विशाल होते याची नव्या पिढीतील तरुण वाचकांना यथार्थ ओळख होईल.

आता फक्त एका गोष्टीविषयी लिहितो. हे लिहितानाही आपले एकूण अज्ञानच आपण प्रकट करीत आहोत असा धोका पत्करूनही मला हा प्रश्न विचारावयाचा आहे. तो खरे तर मी प्रा. सरदारांना विचारावयास हवा होता. परंतु डॉ. इनामदारांचेही या प्रश्नाचे काही स्वतःचे असे उत्तर असेल.

प्रश्न असा : संतसाहित्याची सामाजिक फलश्रुती असा विचार करताना (महाराष्ट्रीय किंबहुना अखिल भारतीय स्तरावरदेखील) आर.डी. रानडे आणि विनोबा यांचा विसर कसा









राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

पडू शकतो?

त्याची काही सयुक्तिक कारणे असतीलच. परंतु असलीच तर त्यांचा निरास करणारी काही सयुक्तिक उत्तरेही असू शकतील. निर्देश राहून जाणे हे मला तरी खटकले ही गोष्ट खरी.

असो. एका सुगम मर्मग्राही मांडणीसाठी डॉ. इनामदार यांचे अभिनंदन.

***देवदत्त दाभोलकर***



---

**वामनराव पटवर्धन - कार्य व कर्तृत्व**, ज.शं. आपटे; हिंद सेवक संघ, पुणे, १९९८; रु. ७५/-.

---

भारताला स्वातंत्र्य द्यायच्या वेळी ब्रिटिशांची मुत्सद्देगिरी भारत-पाकिस्तान अशा विभागणीपुरतीच केवळ सीमित नव्हती, तर देशाचा एक-तृतीयांश भाग ६०० छोट्या- मोठ्या संस्थानिकांमध्ये वाटून पुढील राज्यकर्त्यांच्यापुढे एक जबरदस्त आव्हान देण्यातसुद्धा होती. परंतु सरदार पटेलांसारख्या खंबीर व्यक्तीने हे आव्हान पेलून काही काळातच भारताला अखंडत्व प्राप्त करून दिले. ब्रिटिशांच्या जुलमी सत्तेचे प्रत्यंतर सर्वांना येत होते. परंतु संस्थानिकांच्या मनमानी कारभारात रूढी-परंपरेला चिकटून बसलेल्या संस्थानांतील सर्वसामान्यांत लोकशाही, स्वातंत्र्य, समता इत्यादी मूल्ये रुजविणे फार जिकिरीचे काम होते. आपापल्या राजे-रजवाड्यांच्या विरोधात उभे राहण्यासाठी प्रजेला उद्युक्त करावे लागत असे. अशाही परिस्थितीत सामाजिक व राजकीय सुधारणेच्या निकडीचे भान असलेले कार्यकर्ते नेटाने संस्थानांमध्येसुद्धा प्रबोधनाचे काम करत होते. महाराष्ट्रातील दक्षिणेकडील संस्थानांमध्ये काम केलेल्या वामनराव पटवर्धन या भारत सेवक समाजाच्या कार्यकर्त्याच्या कार्याचा व कर्तृत्वाचा परिचय करून देणारे पुस्तक ज.शं. आपटे यांनी लिहिले आहे. या कार्यकर्त्याभोवती प्रसिद्धीचे वलय नसल्यामुळे आपल्या पिढीतल्या लोकांना हे नाव, कदाचित, ऐकूनसुद्धा माहीत नसणार. परंतु त्या काळात त्यांनी केलेले प्रयत्न, त्यांची तळमळ, खंबीरपणा, जिद्द हे सर्व नोंद घेण्यासारखे आहे, हे पुस्तक वाचल्यानंतर कळते.

१२ जून १९०५ रोजी फर्गसन महाविद्यालयाच्या मागच्या टेकडीवर सूर्योदयापूर्वी भारताच्या सेवेसाठी, सुधारणेसाठी व कल्याणासाठी शपथ घेणाऱ्या ना. गोखले यांच्या सोबत असलेल्या तीन सहकाऱ्यांमध्ये वामनराव पटवर्धन (१८७३-१९३९) होते. "सुशिक्षित तरुण मंडळींनी त्यागाची व देशकार्यास समर्पण करून घेण्याची वृत्ती प्रकट करावी" या गोखलेंच्या आवाहनाला प्रतिसाद देऊन हयातभर सेवाव्रताने काम करणारे वामनराव यांचा भारत सेवक समाज संघ (सर्व्हंट्स ऑफ इंडिया सोसायटी) या संस्थेच्या कार्यामध्ये स्थापनेपासूनच फार मोठा सहभाग होता. भारतसेवकाने पार पाडावयाचा कार्यक्रम व प्रत्येक कार्यकर्त्याने पाळावयास हवी असलेली सप्तव्रते यांची तपशील वाचल्यास (पा. २५-२७) अजूनही त्याची तेवढीच गरज आहे असे वाटू लागते. स्वार्थ साधण्यासाठीच राजकीय व सामाजिक कार्याचा आव आणणाऱ्यांना मागच्या पिढीत निष्कामपणे व व्रतस्थवृत्तीने कार्य करणारे शेकडो कार्यकर्ते होते, यावर विश्वास बसणार नाही.

भारत सेवक समाजासाठी पहिली काही वर्षे ना. गोखले यांच्यावरोबर काँग्रेसच्या *इंडिया* या नियतकालिकासाठी वर्गणीदार वाढविणे, संकल्पित रानडे अर्थशास्त्र संस्थेसाठी निधिसंकलन करणे, गोखले यांच्याशी संपर्क ठेवणे, पत्र-व्यवहार करणे इत्यादी कामे वामनराव यांनी केली. परंतु याहीपेक्षा मुद्रक व प्रकाशक म्हणून वामनराव पटवर्धन यांचे कार्य जास्त उद्बोधक आहे.

मुद्रक व प्रकाशक म्हणून वामनराव यांनी ३०-३२ वर्षे काम केले. आर्यभूषण व ज्ञानप्रकाश या छापखान्यांचे मालकीहक्क भारत सेवक समाजाकडे आल्यानंतर या दोन्ही मुद्रणालयांच्या व्यवस्थापनाची जबाबदारी ना. गोखले यांनी वामनराव यांच्यावर सोपविली. १९३६ मध्ये लागलेल्या प्रचंड आगीत संपूर्ण छापखाना भस्मसात झाला. संस्थेला त्यामुळे फार मोठे नुकसान सोसावे लागले. तरीही नाउमेद न होता व्यवस्थापक म्हणून वामनराव यांनी मुद्रणालयाची पुनः उभारणी केली. त्यासाठी निधिसंकलन केले. सर्व कामगारांनी विनावेतन काम केले. कामगारांच्या श्रमातून फर्गसन रस्त्यावर ही इमारत उभी झाली. आर्यभूषणची मालकी जरी भारत सेवक समाजाकडे होती, तरी वामनरावांचे सर्व राजकीय पुढाऱ्यांशी व कार्यकर्त्यांशी







अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

स्नेहाचे संबंध होते. त्यामुळे त्यांनी आपल्या संस्थेच्या व्यवसायात भेदभाव मुळीच दाखविला नाही व कोणाचीही अडचण होऊ दिली नाही.

मुद्रण व्यवसाय हाही देशसेवेचा भाग आहे अशीच त्यांची मनोमन श्रद्धा होती. इंग्रजी, देवनागरी, गुजराती, कन्नड, उर्दू लिपीतून छपाईचे काम केले जात असे. अनेक वर्तमानपत्रे, साप्ताहिके, इंग्रजी, मराठी, गुजराती नियतकालिके, ग्रंथ इत्यादी येथे छापली जात. म. गांधींच्या 'हरिजन' या साप्ताहिकाची छपाईसुद्धा काही काळ याच छापखान्यात होत असे. कामगारांसाठी पतपेढी, प्रॉव्हिडंट फंड, बोनस, वेल्फेअर फंड यांचीसुद्धा तरतूद असे. मुद्रण व्यवसायातील अडचणी व पुढील कार्याचा आढावा घेणारे, १९३७ मध्ये स्वागताध्यक्ष या नात्याने पटवर्धन यांनी केलेले भाषण आजही मार्गदर्शक ठरणारे आहे. (परिशिष्ट क्र. ७)

वामनराव मूळचे सांगलीचेच असल्यामुळे त्यांचा सांगली, मिरज, बुधगाव, जमखंडी या संस्थानांच्या अधिपतींशी घनिष्ट संबंध होता. या संस्थानिकांच्या मुलांना ते शिकवत असल्यामुळे त्यांना 'मास्तर' म्हणून सर्व संस्थानिक परिवार ओळखत असे. अशा संस्थानातील प्रजेला लोकशाही म्हणजे काय? संस्थानाच्या बाहेरच्या जगात काय चालले आहे? याची कल्पना देण्यासाठी, त्यांचे प्रबोधन करण्यासाठी 'संस्थानी स्वराज्य' नावाचे नियतकालिक त्यांनी चालविले. या भागातील संस्थानी चळवळीस योग्य दिशा, उठाव व कार्यक्रम देण्यात 'संस्थानी स्वराज्या'चा व वामनरावांचा वाटा फार महत्त्वाचा होता. 'केसरी'कार न.चिं. केळकर व वामनराव यांनी पुढाकार घेऊन संस्थानिकांच्या अधिपत्याखाली जबाबदार स्वराज्यपद्धती राबविण्यासाठी 'अखिल भारतीय संस्थान लोकपरिषदे'ची स्थापना केली. वेगवेगळ्या संस्थानांत तिची अधिवेशने भरविण्यात आली. ब्रिटिश सरकारचा संस्थांनांसंबंधीचा दृष्टिकोन, संस्थानिकांची वृत्ती-प्रवृत्ती, जनतेला प्रशासनात सहभाग व योग्य प्रतिनिधित्व इत्यादी अनेक महत्त्वाच्या प्रश्नांसंबंधीची चर्चा या अधिवेशनांत होत असे. भोर, औंध, फलटण, सांगली, कोल्हापूर, जमखंडी, मिरज, बुधगांव या संस्थानांतील जनतेला लोकशाही हक्क मिळावेत म्हणून वामनराव यांनी भरपूर प्रयत्न केले. सभा, परिषदा, संमेलने भरवून निर्भीडपणे जनता व संस्थानिकांसमोर आपली मते व उद्दिष्टे ते मांडत होते.

भौगोलिक व सामाजिक-आर्थिक परिस्थितीमुळे प्रत्येक संस्थानाच्या वेगवेगळ्या समस्या होत्या. संस्थानिकांच्या लहरीप्रमाणे कारभार चालत असे. अनेक हितसंबंधांचा गुंता होता. मान-सन्मानाच्या चित्रविचित्र कल्पना होत्या. परंतु वामनराव समस्येच्या मुळाशी जाऊन उत्तर शोधत असत. स्वतः उदारमतवादी असल्यामुळे दोन्ही बाजू नीटपणे ऐकून व्यवहारी, व्यापक व प्रयोगशील दृष्टिकोनातून निर्णय देण्याकडे व कार्यवाही करण्याकडे त्यांचा कल असे. अडीअडचणीच्या प्रसंगी तडजोडीने काम करणे व लहानापासून थोरांपर्यंत अत्यंत प्रेमाने वागणूक देणे यावर त्यांचा भर असे.

लेखकाने संस्थानातील परिस्थिती व त्यांच्या समस्या इत्यादींबद्दल अभ्यास करून त्यावेळचे चित्र उभे केले आहे. वामनरावांची संपूर्ण ओळख व्हावी यादृष्टीने अनेक संदर्भ तपासून व आवश्यक अशी अनेक परिशिष्टे जोडून एक ऐतिहासिक दस्तऐवज तयार करण्याची जबाबदारी लेखकाने पूर्ण केली आहे.

मागच्या पिढीतील कार्याकडे तुसडेपणाने बघण्याच्या दृष्टीमुळे आपण काही चांगल्या गोष्टींना मुकत आहोत याची कल्पना अनेकांना नसते: अनुभवांचा एवढा मोठा साठा असताना अनेक वेळा आपण उगीचच चाचपडत असतो. दरवेळी 'रिइन्व्हेंटिंग द व्हील' करून वेळ, शक्ती व श्रम वाया घालवीत राहतो. त्या दृष्टीने अशा प्रकारच्या पुस्तकांचा आपल्याला नक्कीच उपयोग होईल.

*प्रभाकर नानावटी*



**माझी चित्रफीत** – बाळ बापट, शुभदा-सारस्वत प्रकाशन, पुणे ४११ ००५. किंमत रु. १०५/-.

मराठी चित्रपटसृष्टीमधले एकेकाळचे आघाडीचे प्रकाशलेखक (कॅमेरामन) बाळ बापट यांची ही आत्मकथा आहे. आपल्या प्रदीर्घ कारकीर्दीत बापटांनी एकूण ६ हिंदी, २६ मराठी, २ इंडोनेशियन, १ तमिळ अशा एकूण ३६ चित्रपटांचे प्रकाशलेखन केले. परंतु याशिवाय भारत सरकारच्या फिल्म्स डिव्हिजनमध्ये नोकरी करताना त्यांनी केलेली कामगिरी तितकीच उल्लेखनीय









राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

आहे. हिमालयात, ईशान्य भारतात, कच्छच्या रणात, अंदमानात, भारतपाक युद्धाच्या ऐन धुमश्चक्रीत अनेक प्रसंगांचं चित्रण करण्याची संधी त्यांना मिळाली. त्याचबरोबर भारतीय तसंच परदेशीय पंतप्रधानांसारख्या मान्यवर व्यक्तींच्या दौऱ्यांमध्ये सामील होण्याचे अनुभव आले. नासेर यांची अंत्ययात्रा, गुजरातमधील नवनिर्माण आंदोलन यांसारख्या ऐतिहासिक प्रसंगांच्या, घटनांच्या प्रतिमारूपी नोंदी करायला मिळाल्या. या सर्व कालखंडांमध्ये त्यांच्या धैर्याची, कौशल्याची कसोटी पाहणारे अनेक प्रसंग आले. त्यामुळेच त्यांचे हे अनुभव सकस आणि समृद्ध झाले. या सगळ्यांची हकीकत या पुस्तकाद्वारे बापट आपल्याला सांगतात.

"दिनांक २४ फेब्रुवारी, १९६४, स्थळ दिल्लीचा पालम विमानतळ. गुवाहाटीला जाण्यासाठी मी आलो होतो. पहाटे साडेपाचची वेळ. फेब्रुवारी महिन्यात दिल्लीत चांगलीच थंडी असते. हवेत खूपच गारवा होता. विमानतळ गजबजलेला होता. शेकडो रंगीबेरंगी दिवे, धूसर विरळ धुक्यात लुकलुकत होते. येणाऱ्याजाणाऱ्या विमानांचे कानठळ्या बसविणारे आवाज आणि त्यात पब्लिक स्पीकर्सवरून विविध सूचनांची भर." अशा चित्रपटाच्या संहितेला साजेशा भाषेत बापट आत्मकथनाला सुरुवात करतात. हा प्रसंग आहे नागरिक (प्रकाशचित्रकार) बाळ बापट यांचं मेजर बाळ बापट या व्यक्तीमध्ये रूपांतर होण्याचा. आपला हा प्रौढ वयातला व्रतबंध बाळ बापट त्यातल्या विधींसह वर्णन करतात. एक मध्यमवर्गीय, व्यावसायिक शिस्तीचा मराठी माणूस अचानक लॉंगर, नागपाल, पावळे अशासारख्यांनी व्यापलेल्या विस्तृत भारतीय लष्करी कुटुंबात दाखल होतो. पदोपदी नेमकेपणाची अपेक्षा करणारी लष्करी जीवनशैली आणि अमराठी प्रदेशात, वातावरणात काम करण्याची जबाबदारी या गोष्टींशी जुळवून घेण्याचा ताण त्यांनी प्रांजळपणे वर्णन केलेला आहे. "मराठी नसला तरी मेजर पावळे 'आपला माणूस' वाटला." अशासारख्या वाक्यांमधून त्यांची मनःस्थिती स्पष्ट होते.

यानंतर बापट मनोवेगाने मागे आपल्या बालपणात आणि जन्मगावी म्हणजे यवतमाळमध्ये जातात. त्यांच्यावरचे कौटुंबिक संस्कार आणि बाळपणातच राष्ट्रीय स्वयंसेवक संघाच्या शाखेत दाखल होणं या त्यांच्या आयुष्यावर दूरगामी परिणाम करणाऱ्या गोष्टींचं वर्णन ते करतात. पण त्यात सर्वात महत्त्वाची गोष्ट ठरते ती चौथी पास झाल्यानंतर वडिलांनी त्यांना बक्षीस म्हणून दिलेला, चार रुपये किंमतीचा कोडॅक बॉक्स कॅमेरा. यवतमाळमधल्या विठोबा बगारे यांच्याकडे त्यांच्या तंत्रप्रशिक्षणाची सुरुवात होते. कालांतराने गोडबोले, गोंधळेकर, भट या गुरुवर्यांशी बापटांची वेगवेगळ्या टप्प्यांवर गाठ पडते. विषयाच्या ओघात मराठी चित्रपटसृष्टीत त्यांचा प्रवेश कसा झाला तेही ते सांगतात. इथून पुढे त्यांचं आत्मकथानक जणू पूर्वस्मृतीच्या (फ्लॅशबॅक) तंत्राने ते वर्णन करत राहतात. घर, लष्कर, फिल्म्स डिव्हिजन, मराठी चित्रपटसृष्टी आणि संघसंस्कार या पाच प्रदेशांमधून त्यांची जीवनकहाणी पुढे सरकताना दिसते.

घरातल्या व्यक्तींबाबत बोलताना त्यांच्या शब्दांमध्ये बराचसा ओलावा आणि कृतज्ञता दिसून येते. मराठी चित्रपटसृष्टीमध्ये त्यांची कामगिरी विपुल आहे. आयुष्याच्या या टप्प्यात तंत्रज्ञ म्हणून विकसित होण्याच्या संधी त्यांना मिळाल्या, पण त्या कष्टसाध्य होत्या. एक 'फडतूस, पोरगेला घाटी' तरुण प्रकाशचित्रकार 'लाखाची गोष्ट', 'पेडगावचे शहाणे', 'जगाच्या पाठीवर' यांसारख्या चित्रपटांचा यशस्वी प्रकाशचित्रकार आणि मराठी चित्रपटसृष्टीतला अग्रगण्य तंत्रज्ञ कसा झाला, याचा वृत्तान्त वाचनीय आहे. हा अनेक वर्षांचा प्रवास वर्णन करताना सुरुवातीला झालेल्या चुका, फजिती याचं वर्णनही ते प्रांजळपणे करतात. गदिमा, राजा परांजपे, सुधीर फडके या त्यांच्या श्रद्धास्थानांबाबत ते भावुकतेने लिहितात. आचार्य अत्रे, पु.भा. भावे, राजा नेने अशांसारख्या अनेक मान्यवरांच्या बरोबर काम करताना आलेले अनुभवही त्यांनी वर्णन केलेले आहेत. के. नारायण काळे यांसारख्या ज्ञानी व्यक्तींबरोबर चर्चा करत, 'अमेरिकन सिनेमॅटोग्राफर' सारखी नियतकालिकं वाचत, स्वतःच्या कामात विविध तांत्रिक प्रयोग करत परिश्रमांनी शिकण्याचा मार्ग बापट यांनी स्वीकारलेला होता. विशेषतः 'लाखाची गोष्ट' आणि 'पेडगावचे शहाणे' या चित्रपटांमधल्या विशेष तांत्रिक परिणामांची वर्णनं उद्‌बोधक आहेत. या विषयाच्या विद्यार्थ्यांना त्यात रस वाटावा. चित्रीकरणाच्या संदर्भात इतरांशी झालेल्या वादविवादांबाबत लिहिताना 'स्टुडिओतले प्रसंग' याच स्वरूपाचं वर्णन त्यांच्याकडून केलं जातं. व्यक्तिगत हेवेदावे, दर्प, असूया इत्यादींचा स्पर्श त्यांच्या लिखाणाला नाही, स्वतःची सरशी वर्णन करण्याचा अभिनिवेश नाही, विशेष म्हणजे प्रसंगी इतरांचे टीकात्मक उल्लेख असले तरी त्यात कटुता नाही.





राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

फिल्म्स डिव्हिजन आणि भारतीय लष्कराच्या सेवेतले अनुभव सर्वाधिक नाट्यमय आणि वेगळ्याच प्रतीचे आहेत. स्टुडिओंत किंवा कथात्मक चित्रपटांवर काम करताना सांघिक कौशल्याने निर्मिती होत असते. कथा, संहिता, दिग्दर्शक प्रकाशचित्रकाराला किती वाव देतात, अभिनेते, निर्माते यांचं सहकार्य किती प्रमाणात असतं या सगळ्याचा परिणाम प्रकाशचित्रकाराच्या कामावर होत असतो. परंतु अनुबोधपट, चित्रवृत्तान्त, वातम्यांसाठीचं चित्रीकरण या कामासाठी प्रकाश-चित्रकाराच्या व्यक्तिगत कौशल्याचा, प्रसंगावधानाचा, झटपट निर्णय घेण्याच्या क्षमतेचा कसच लागतो. युद्धासारख्या प्रसंगी किंवा पंतप्रधानाचा आगमन-सोहळा अशासारख्या प्रसंगी प्रकाशचित्रकाराला काही वेळेस क्षणार्धात स्वतःच निर्णय घ्यावे लागतात आणि तावडतोव अमलात आणावे लागतात. सल्लामसलत, पूर्वतयारी, तक्रारी यांना त्या ठिकाणी वाव नसतो. अशा अनेक प्रसंगांमधून वापटांना जावं लागलं. त्यांचा आकर्षक वृत्तान्त त्यांनी लिहिलेला आहे. 'यू हॅव टु सर्वाईव्ह ऑन युअर विट्स' हा कर्नल लॉंगर यांनी दिलेला गुरुमंत्र वापटांना सातत्याने लक्षात ठेवावा लागला.

हे सर्व प्रसंग वापट यांच्या स्मरणात अगदी ताजे असावेत. कारण, त्यातल्या संवादांच्या व इतर ठळक तपशिलांसकट नाटकी शैलीत त्यांनी ते लिहिलेले आहेत. विशेषतः कच्छच्या रणातल्या संग्रामाचा जनरल खन्ना यांना नकाशाच्या आधारे तपशीलवर सांगितलेला वृत्तान्त किंवा १९६५ च्या युद्धात वराकी या लाहोरजवळच्या गावातल्या आपल्या घरात फाळणीच्यावेळी पुरून ठेवलेले दागिने भारतीय लष्कराच्या मदतीने उकरून काढण्यात सरदार सुंदरसिंग या वृद्धाला मिळालेलं यश या घटना उल्लेखनीय आहेत. आणि या सगळ्या जिकिरीच्या, धाईगर्दीच्या वातावरणातदेखील, कच्छच्या रणातून प्रवास करताना वापटांची सौंदर्यदृष्टी जागृत असते. " .. आम्ही चोहो वाजूंना फक्त शुभ्र पांढरी चादर पसरल्याप्रमाणे असणाऱ्या रणातून प्रवास करू लागलो. रस्ते नाहीतच. कसेही जा. टणक पांढऱ्या मिठाने आच्छादलेला पांढरा शुभ्र गालिचाच. त्यात मिठाचे बारीक लक्षावधी स्फटिक सप्तरंगांची उधळण करीत. अगदी सौम्य, परावर्तित असे सप्तरंग फारच विलोभनीय दिसत होते. मध्येच कुठेतरी 'चिंगारा' ह्या हरिण कुळातील लहानग्या प्राण्याची चाहूल लागायची व आमची चाहूल लागताच तो सरकन पळून जायचा. त्याच्या इवल्याशा खुरांचे 'पगमार्क' पांढऱ्या, स्वच्छ आच्छादित सपाट, मीठवाळूवर स्पष्ट दिसायचे. त्याचा माग सहज काढता यावा असे."

वापटांची भाषा वोलीभाषेला जवळची आहे. प्रसंग वर्णन करताना ते संवादांचा वापर करतात. त्यामुळे निवेदनाला ओघ येतो. वापटांची एकंदर वृत्ती संतुलित आहे. त्यामुळे कुठल्या एखाद्याच व्यक्तीत, प्रसंगात किंवा विषयात ते अडकून पडत नाहीत, कशाचा पाल्हाळ लावत नाहीत. प्रामाणिकपणा आणि नम्रता हे त्यांचे स्थायीभाव असावेत असं पुस्तक वाचताना अनेकदा वाटतं, त्यामुळे त्यातली काही वेळेला जाणवणारी भावुकता आपण समजावून घेतो. 'फोटोग्राफर' म्हणजे सगळ्यांना एका रांगेत उभं करून त्यांचे चकचकीत फोटो काढणारा माणूस असा समज सहसा आपल्याकडे दिसतो. वापटांचं पुस्तक वाचल्यावर प्रकाशचित्रकार हा संवेदनाक्षम कलावंत असतो, चित्रीकरणाच्या प्रक्रियेत तो महत्त्वाची जवावदारी पेलतो, इतर कुठल्याही कलावंताप्रमाणे त्याची कलाही कष्टसाध्य असते, तो त्याचा हयातभरचा प्रवास असतो आणि त्याच्या अनुभवांनाही एक समृद्धता असते हे लोकांच्या लक्षात यावं.

इतर सर्व गोष्टींवावत आवर्जून लिहिलेल्या वापटांनी त्यांच्या इंडोनेशियातल्या वास्तव्यावावत मात्र जवळजवळ काहीच लिहिलेलं नाही. त्या काळात एका मराठी प्रकाशचित्रकाराला असे अनुभव मिळणं दुर्मिळ होतं. त्यामुळे त्यावावत एक प्रश्न मनात राहतो. त्याचवरोवर असंही वाटतं की, चित्रीकरणकलेवद्दल नवोदितांना, इतरेजनांना सांगण्यासारखं वापटांच्याकडे अजूनही वरंच काही असावं. त्यामुळे त्या संदर्भात त्यांची लेखणी पुन्हा एकदा कार्यरत होईल अशी अपेक्षा वाळगावी काय?

छपाईच्या वावतीत मात्र दोन गोष्टी खटकतात. सजा-वटीच्या स्वरूपात प्रत्येक पानाच्या दोन्ही वाजूला फिल्मची 'स्प्रॉकेट होल्स' छापण्याची गरज होती का? चित्रपटाच्या संदर्भातल्या प्रत्येक माहितीपत्रकावर, पोस्टरवर वगैरे वापरून वापरून वटवटीत झालेली ती एक प्रतिमा आहे. दुसरी गोष्ट म्हणजे पुस्तकात वापरलेल्या प्रकाशचित्रांचा दर्जा निकृष्ट आहे. काही ठिकाणी प्रतिमा इतकी अस्पष्ट आहे की, खालची ओळ वाचल्याशिवाय प्रकाशचित्र कशाचं आहे त्याचा अर्थवोध होत नाही. एका नामांकित प्रकाशचित्रकाराच्या पुस्तकात असा दोष राहावा हा दैवदुर्विलास आहे. अन्यथा पुस्तक वाचनीय आहे.

*अनिल झणकर*






अनुक्रमणिका

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

**अन्वय**, सु.श्री. पांढरीपांडे; प्रतिमा प्रकाशन, पुणे, १९९५; रु. ८०/-.

*अन्वय* हा सु.श्री. पांढरीपांडे यांनी वेळोवेळी लिहिलेल्या काही निवडक लेखांचा संग्रह आहे. या सर्व लेखांवर गांधी व विनोबा यांच्या विचारांची गडद छाया पसरलेली आढळते. या संग्रहातील पहिल्या तीन लेखांत भांडवली व्यवस्था, साम्यवाद, लोकशाही, विज्ञान-तंत्रज्ञान, विकास इत्यादींच्या सामाजिक परिस्थितीवर होणाऱ्या परिणामांचे विश्लेषण आहे. पुढील दोन लेख गांधी, नेहरू, टागोर व मानवेंद्रनाथ रॉय यांच्या विचारसरणीवर आहेत. गांधी व विनोबांचे तत्त्वज्ञानच आजच्या संकटमय परिस्थितीत आपले मार्गदर्शन करू शकते, याचे प्रतिपादन शेवटच्या चार लेखांत लेखकाने केले आहे. सुरेंद्र वारलिंगे यांच्या प्रस्तावनेत *अन्वय* वाचून त्यांना आलेल्या प्रत्ययाची मांडणी आहे.

प्रबोधनाशी संबंधित पहिल्या तीन लेखांचा आवाका फार मोठा आहे. सारी मानवजात एका कल्पांताच्या कड्यावर उभी असून, गंभीर परिस्थितीची जाणीव नसल्यामुळे अंधारात चाचपडत आहे, असे लेखकाला वाटते. आल्विन टॉफ्लरच्या *थर्ड वेव्ह* या पुस्तकाचा हवाला देऊन पांढरीपांडे म्हणतात की, विचाराच्या व व्यवहाराच्या पातळ्यांवर जागतिक परिस्थितीने आव्हान उभे केले आहे व आजचे विचारवंत याकडे पुरेशा गांभीर्याने बघत नाहीत. संपूर्ण मानवजातीवर कोसळलेल्या संकटांच्या मुळाशी आपण अंगीकारलेली जीवनशैली असून ही संकटे आपल्या सामाजिक, आर्थिक, राजकीय व सांस्कृतिक जीवनाचा कब्जा घेत आहेत. चुकीच्या भांडवली व्यवस्थेच्या चौकटीतच आपण आपल्या जीवनपद्धतीची रचना केल्यामुळे सर्व प्रकारची संकटे आपला पाठपुरावा करत राहणारच. या संकटमालिकांचा परिपाक म्हणजे आजची पर्यावरण-प्रदूषणाची समस्या होय. प्रचंड औद्योगीकरणामुळे होत असलेला नैसर्गिक संपत्तीचा ऱ्हास, पाणी, हवा इत्यादी पर्यावरणीय घटकांचे प्रदूषण, स्वास्थ्याला हानीकारक असलेल्या घातकद्रव्यांत वाढ, या केवळ आता पाश्चात्त्य, समृद्ध देशांच्या समस्या राहिल्या नसून भारतासारखे देशसुद्धा यात भाजून निघत आहेत. जोपर्यंत आपण आपल्या भोवती आखून घेतलेली ही भांडवली चौकट मोडू शकत नाही, तोपर्यंत या समस्या राहणारच. कारण भांडवलीव्यवस्थेत उत्पादनावर मर्यादा म्हणजे एक प्रकारे व्यवस्थेची आत्महत्याच. अनिर्बंध उत्पादन, कृत्रिम गरजा व रोज नवीन बाजारपेठांचा शोध यावर तर भांडवली व्यवस्थेची सारी मदार आहे. यासंदर्भात *लिमिट्स टु ग्रोथ* या क्लब ऑफ रोमच्या १९७५ मध्ये प्रकाशित झालेल्या अहवालाची साक्ष लेखकाने काढली आहे. "लोकसंख्या, उद्योगीकरण, प्रदूषण, अन्नधान्याचे उत्पादन आणि नैसर्गिक संपत्तीची हानी याबाबतीत जगभर जी वाढ होत आहे, तिची दिशा जर अशीच कायम राहिली तर येत्या शंभर वर्षांच्या आतच वाढीची अखेरची सीमा गाठली जाईल. परिणामी एकाएकी लोकसंख्या आणि औद्योगिक क्षमता याची घसरण होण्याचा संभव राहील व ही घसरण थोपवून धरणे मानवी शक्यतेच्या बाहेर असेल. म्हणूनच प्रगतीची दिशा बदलणे आणि आर्थिक स्थैर्याची टिकाऊ स्थिती निर्माण करणे आवश्यक आहे." माणसाचे मोठेपण चारित्र्य व सद्‌गुणांवरून न ठरवता, त्याच्या स्थावर-जंगम संपत्तीवरून ठरवणारी जीवनदृष्टीच भांडवली व्यवस्थेत अपेक्षित असते. नवनव्या 'गरजां'ची निर्मिती, ग्राहकांचा पिच्छा, व्यवहार करताना विधिनिषेधशून्यता, सूक्तासूक्ततेचा विचार न करण्याची वृत्ती, विलासप्रधान व चंगळवादी दृष्टीची लोकप्रियता या सर्व गोष्टी याच चौकटीत बसतात. मग त्यासाठी वाटेल ती किंमत देण्याची तयारी असते.

या चौकटीला पर्याय म्हणून साम्यवादाचा प्रयोगसुद्धा सपशेल फसला. ज्या क्रांतीच्या विचारसरणीने मानवजातीच्या इतिहासात एका नव्या, शोषणविरहित जीवनदृष्टीचे स्वप्न सर्वांसमोर ठेवले ती इतकी अल्पजीवी ठरावी हे मानवजातीचे दुर्दैव म्हणावे लागेल. आर्थिक हलाखी, दैन्य, वंचितता, भ्रष्टाचार, उच्चपदस्थ व्यक्तींची ओंगळ जीवनशैली हेच साम्यवादाचे व्यवहारातील फलित असेल तर, या तत्त्वज्ञानाचे पुन्हा एकदा मूल्यमापन करण्याची आवश्यकता आहे. लेखकाच्या मते साम्यवादी विचारातील अंगभूत उणीवाच यास कारणीभूत आहेत. काही व्यक्तींमुळे साम्यवादाचे विकृतीकरण झाले, हा खुलासा पांढरीपांडे यांना समाधानकारक वाटत नाही. कारण मुळातच व्यक्ती व विचारस्वातंत्र्याविषयी संदिग्ध भूमिका, मानवीमूल्यांचा लावलेला अर्थ, जनसामान्यांपेक्षा पक्ष व पक्षकार्यकर्ता यांच्यावर भर इत्यादींमुळे साम्यवाद एका भोवऱ्यात'






अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

सापडला व त्यातून बाहेर येणे अशक्य झाले. उद्योगव्यवस्थेचे राष्ट्रीयीकरण व शेतीचे सामूहिकीकरण हे काही उत्तर नव्हे, याचीसुद्धा प्रचिती आली. शोषणव्यवस्थेचे एक भयानक रूप पुढे आले. त्यामुळे साम्यवादाचा पराभव केवळ आर्थिक अथवा राजकीय होता एवढेच नव्हे, तर तो नैतिक अधःपातसुद्धा होता, असे लेखकास वाटते.

साम्यवाद व भांडवलशाही यास पर्याय म्हणून स्वातंत्र्योत्तर काळात नवभारताच्या जडणघडणीसाठी आपण सर्व चांगल्या घटकांचे मिश्रण करून एका मिश्र अर्थव्यवस्थेचा स्वीकार केला. लोकशाही–समाजवादी–धर्मनिरपेक्ष .... अशा राष्ट्र-निर्मितीचे स्वप्न पाहत असताना आज मात्र सर्व आघाड्यांवर निराशाच पदरी येत आहे. बेकारी, विषमता, दारिद्र्य व उपासमार यांना आपण हटवू शकलो नाही. विकास कार्यक्रमांमधून उत्पादनवाढ करणे शक्य झाले; परंतु त्याचा लाभ सधन व साधनसंपन्न लोकांनाच झाला. क्षेत्रीय असंतुलन वाढले. आतंकवाद, विभाजनवाद आणि दहशतवाद यामुळे राजकीय, सामाजिक, आर्थिक परिस्थिती भीषण स्वरूप घेताना दिसत आहे. या परिस्थितीतून निर्माण झालेल्या ताणतणावांना आणि अंतर्विरोधांना पेलून धरण्यास लोकशाही असमर्थ ठरत आहे. तत्त्वहीन तडजोडी, वेळकाढूपणा व कचखाऊपणाचे धोरण यामुळे राजकीय असुरक्षितता व साशंकता वाढत आहे. राजकारणाचे गुन्हेगारीकरण व गुन्हेगारांचे राजकारण यामुळे पूर्ण लोकशाही धोक्यात आली आहे. दलित आणि स्त्रियांवरील अत्याचार, वाढती जातीय तेढ, सांप्रदायवादाने धारण केलेले उग्र आणि आक्रमक रूप या गोष्टी स्वातंत्र्य, समता व सामाजिक-आर्थिक न्याय यांना मूठमाती देत आहेत.

मिश्र अर्थव्यवस्थेच्या भरवशावर समाजवादी समाजाची लोकशाही मार्गाने उभारणी करण्याचा प्रयोगही अयशस्वी ठरला आहे. या मिश्रव्यवस्थेला पर्याय म्हणून भांडवली व्यवस्थेचा स्वीकार केल्यास वा भांडवली व्यवस्थेला मानवी मुखवटा चढविण्याचा प्रयत्न केल्यास समस्या दूर होतील हाही एक भ्रम आहे. पुंजीवादाचा कावा वेळीच ओळखणे अत्यंत गरजेचे आहे.

आज स्वीकार केलेल्या सर्व वैचारिक व्यूहांमध्ये विज्ञान-तंत्रज्ञानाला फार महत्त्वाचे स्थान दिले जात असल्याने लेखकाने आधुनिक विज्ञानाने सांस्कृतिक मूल्यासंबंधी उभ्या केलेल्या आव्हानाबद्दल विस्तृतपणे चर्चा केली आहे. इंद्रियगम्य अनुभवाच्या आधारे आणि पुराव्यानिशी सिद्ध केले जाणारे ज्ञान हेच खरे ज्ञान, ही वैज्ञानिक परिभाषा लेखकाला मान्य नाही.

मानवजातीच्या अनेक समस्यांचे मूळ त्याच्या विकासाच्या कल्पनेतसुद्धा आहे असे लेखकाला वाटते. जीवनाचे साफल्य कशात शोधायचे? जीवनाचे उद्दिष्ट काय? मानव नेमके काय साधू इच्छितो? इत्यादी प्रश्नांना आपण काय उत्तर देतो यावर विकासाची संकल्पना अवलंबून राहायला हवी. केवळ भौतिक सोयी आणि सुविधा म्हणजेच विकास ही मानसिकता संपूर्ण समाधान देऊ शकणारी नाही. अमर्याद उत्पादन, अनिर्बंध उपभोग, मोठाले औद्योगिक प्रकल्प, मोठाली शहरे आणि 'हाय-टेक्' जीवनशैली यांनाच विकास म्हणणे श्रेयस्कर ठरणार नाही. लेखकाच्या मते आपल्या आर्थिक व उत्पादन व्यवस्थेला, नीतिविचारांना आंतरिक भावनिक जीवन व समाज-निसर्ग-पारलौकिक तत्त्व यांच्याशी असलेला त्यांचा संबंध आकार देत असतात. आधुनिक विकासाच्या संकल्पनेचे विवेक, विज्ञान-तंत्रज्ञाननिष्ठा, ऐहिकता व उपयोगितावाद हे प्रमुख घटक आहेत. त्यांतील विवेकवाद, विज्ञाननिष्ठा व ऐहिकता परस्परपूरक आहेत. या घटकांवर आधारलेला नवा समाज निर्माण करण्याची आग्रही भूमिका महात्मा फुले, आगरकर व डॉ. आंबेडकर यांनी यापूर्वीच मांडली होती. मात्र यातील उपयोगितावाद (युटिलिटेरियनिझम) आपल्या जीवनदृष्टीला अगदी वेगळेच परिमाण देऊ शकतो. कारण उपयोग व उपभोग यात व्यावहारिक पातळीवर अंतर केले जात नाही. म्हणूनच अमर्याद उत्पादनाचे अर्थशास्त्र रूढ झाले. मर्यादित साधनसामग्रीमुळे या अर्थशास्त्राला आपोआप मर्यादा पडू लागल्या. मग त्यातूनच शोषणव्यवस्था सर्वमान्य होत गेली. म्हणूनच विकासाच्या प्रचलित अर्थाचा व औचित्याचा गंभीरपणे पुनर्विचार करायला हवा. त्यासाठी वैचारिक परिवर्तन हवे.

वैचारिक परिवर्तनाच्या संदर्भात गांधींचा विचार व व्यवहार प्रचलित व्यवस्थेला ठोस पर्याय होऊ शकेल असा लेखकाचा दृढ विश्वास आहे. माणसाचा उपभोगदेखील त्यागप्रधान व समर्पणवृत्तीतून व्हायला हवा हे विनोबांचे जीवनसूत्र आपण अंगीकारले पाहिजे. सत्य, अहिंसा, समर्पणवृत्ती, अपरिग्रह, नम्रता इ. घटकांच्या साहाय्याने नव्या समग्रताप्रधान जीवनदृष्टीचा आराखडा तयार होऊ शकतो. आणखी प्रगत तंत्रज्ञान, आणखी उच्च कोटीचे कौशल्य यातून कदाचित काही तांत्रिक समस्यांना

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

उत्तर मिळेल. परंतु नैतिक आव्हानासाठी समग्र जीवनदृष्टीच स्वीकारावी लागेल. गांधीजींच्या *हिंदस्वराज्य* या पुस्तकामधील मांडणीत आपल्यासमोर उभ्या असलेल्या अनेक प्रश्नांना समर्पक उत्तर शोधता येते, म्हणून लेखक गांधीविचाराचा प्रस्ताव आपल्यासमोर ठेवत आहे.

गांधीविचारात इहवादाला राजनीतीचे अध्यात्मीकरण, विवेकवादाला अंतरात्म्याची हाक, विज्ञान-तंत्रज्ञानाला ग्रामोद्योग, संसदीय लोकशाहीला ग्रामराज्य असे अनेक पर्याय सापडतात. त्यामुळे अनेकांना गांधीविचार नेहमीच प्रतिगामी वाटतात. गांधींच्या हयातीत त्यांच्या कट्टर चाहत्यांनीसुद्धा अनेक शंका उपस्थित केल्या होत्या. प्रातिनिधिक म्हणून नेहरू व टागोर यांच्या भूमिकांचा आढावा लेखकाने घेतला आहे.

आधुनिक जगात स्वत:चे अस्तित्व टिकवण्यासाठी आर्थिक समस्यांचे निराकरण करावे लागते. त्यासाठी आत्मनिर्भरता व स्वावलंबन या गांधींच्या मार्गापेक्षा नेहरूंना आधुनिकीकरण-औद्योगीकरण-आंतरराष्ट्रीयता हेच योग्य मार्ग असे वाटत होते. नेहरूंना एकाच वेळी भारतीय परंपरा व पश्चिमी देशांतील आधुनिकता यांच्याबद्दल आकर्षण वाटत असे. परंतु यांच्या परस्परसंबंधांची कोणतीही सुस्पष्ट कल्पना नसल्याने भूत, वर्तमान व भविष्य यांची समाधानकारक अशी सांगड नेहरूंच्या विचारांतून व्यक्त होऊ शकली नाही. टागोरांच्या वाङ्मयात भारतीय अस्मितेचा शोध व पुनर्निर्मिती या गोष्टी प्रामुख्याने येतात. आधुनिक पाश्चात्त्य विचारसरणीत अध्यात्मापेक्षा यांत्रिकतेला, धर्मापेक्षा राजकारणाला व शांततेपेक्षा सत्ताप्रधानता व स्पर्धाप्रधानता यांना अधिक महत्त्व मिळाल्यामुळे मानवी जीवन नैतिक-अध्यात्मिक श्रेयांनाच पारखे झाले आहे. परंतु गांधीविचार व व्यवहार यात याचे उत्तर शोधू नये, असे टागोरांना वाटत होते. अध्यात्म आणि विज्ञान, व्यक्ती आणि समाज, व्यक्तिनिष्ठा व विश्वनिष्ठा, वैविध्य आणि तादात्म्यविचार या परस्परविरोधी वाटणाऱ्या संकल्पनांचा परिहार केवळ बौद्धिक पातळीवरूनच करता येईल, असे त्यांचे मत होते.

लेखकाच्या मते नेहरू व टागोर पाश्चिमात्य तत्त्वज्ञानाचा प्रभाव असलेल्या प्रबोधनाच्या ('एनलायटनमेंट') परिघात राहूनच विचार करत होते; मात्र गांधीजींचा विचार व व्यवहार प्रबोधन विचारसरणीच्या बाहेर जाऊन नवीन दृष्टी देतो. मूलगामी परिवर्तन हे गांधीजींचे उद्दिष्ट होते. स्पर्धा-शोषण-विषमताविरहित उत्पादनपद्धतीवर त्यांचा भार होता.

गांधी, नेहरू, टागोर यांच्या प्रबोधन विचारापेक्षा सर्वस्वी वेगळी परंतु विश्वमानव संकल्पनेच्या अगदी जवळ पोचविणारी, थोर मानवतावादी मानवेंद्रनाथ रॉय यांच्या विचाराची मांडणी एका स्वतंत्र प्रकरणात लेखकाने विस्तृतपणे केली आहे. विलक्षण रोमांचकारी घटनांनी भरलेले, नियतीच्या आणि लोकख्याती व लोकविस्मृतीच्या ऊनसावलीच्या खेळात कृष्ण-धवल झालेले असे आयुष्य इतर कुणा व्यक्तीच्या क्वचितच वाट्याला आले असेल. रॉय यांचे विचार अधिक सखोल व मूलभूत असे होते. भौतिकवाद, मानवतावाद आणि विज्ञानवाद यांच्या आधारावर त्यांनी नवमानवतावादाची उभारणी केली. "सर्व गोष्टींचा अखेरचा मापदंड माणूस आहे" हे त्यांच्या मानवतावादाचे मूलभूत तत्त्व होते.

हे सर्व असूनसुद्धा आज रॉय एवढ्या विस्मरणात कसे काय गेले? नवमानवतावाद एवढा क्रांतिकारी असताना जनसामान्यांच्या व सुशिक्षितांच्या मनाची पकड का घेऊ शकला नाही? लेखकाच्या मते या तत्त्वज्ञानात कृतिप्रेरक अशा गतिशीलतेचा अभाव आहे. मानवतावादाच्या अगदी जवळचे तत्त्वज्ञान असलेल्या गांधीवादात मात्र समाज परिवर्तनाच्या प्रक्रियेसाठी अत्यावश्यक असलेले गतितत्त्व होते. त्यामुळे भारतीय जनमानसात, काही काळ का होईना, गांधीवादाला स्थान मिळाले.

मग आज गांधीवाद कालबाह्य झाला आहे काय?, असा प्रश्न लेखक उपस्थित करतो. एखादी विचारसरणी संकटांना कशी तोंड देऊ शकते यावरच त्याची प्रस्तुतता ठरत असते. लेखकास गांधीविचाराखेरीज आज आपल्याला दुसरा तरणोपाय नाही, असे वाटते. आज भेडसावत असलेल्या पर्यावरण समस्येचे मूळ आत्यंतिक औद्योगीकरणात असून निसर्गाकडे बघण्याची आजवरची शिष्टमान्य दृष्टीच फार चुकीची आहे, याचा प्रत्यय येत आहे. गांधीवादाला अर्थरचना व नीती यांमधील फारकत मान्य नसल्यामुळे मूळ जीवनदृष्टीत फार मोठा फरक पडत जातो व त्यामुळे अशा समस्यांना थारा मिळत नाही. शोषणरहित समाजाचे उद्दिष्ट असलेल्या साम्यवादाच्या तत्त्वज्ञानात साधन-शुचितेला अजिबात महत्त्व नव्हते. त्यामुळे साम्यवादाचा पराभव झाला. परंतु साध्याइतकेच साधनशुचितेलाही गांधीविचारात प्राधान्य असल्यामुळे साम्यवादातील दोष आपोआप नाहीसे होतील. आक्रमक, आक्रस्ताळे अशा हिंदू संप्रदायवादाने आपले राजकीय, सामाजिक व सांस्कृतिक जीवन गढूळ, कटू व

अनुक्रमणिका


मराठीचा विकासः महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

विषारी करून टाकले आहे. परंतु गांधी विचारपद्धतीत सर्वधर्मसमभावाला व्रताचे स्थान आहे. त्यामुळे हा आक्रस्ताळेपणा राहणार नाही. शिवाय गांधींच्या मते सर्व धर्म अपूर्ण आहेत आणि त्यात सुधारणेला केवळ वावच नव्हे तर तशी गरजही आहे. संग्रहाऐवजी त्याग, अहंकेंद्रिततेऐवजी अहंतेचा निरास, स्वार्थाऐवजी निःस्पृहता, स्पर्धेच्या ऐवजी सत्कार्य, ईर्षेच्या ऐवजी प्रेम व सहानुभूती अशा मूल्यांचा सर्वांकडून स्वीकार झाल्यास स्त्रियांच्या म्हणून ज्या समस्या ओळखल्या जातात त्या समस्यासुद्धा राहणार नाहीत. स्त्री-मुक्तीचा विचार औद्योगिक समाजरचनेतून कधीच होऊ शकणार नाही. गांधीविचारात सर्जन, संवर्धन व कृतिशीलता यांना महत्त्व असल्यामुळे खऱ्या अर्थाने स्त्री स्वतंत्र होऊ शकते.

धर्मनिरपेक्षतेपेक्षा गांधींना सर्वधर्मसमभाव हाच सेक्युलॅरिझमचा जवळचा अर्थ वाटत होता. धार्मिक श्रेष्ठत्वाचा अहंकार, त्यातून येणारा कट्टरपणा व संकुचितता यांना त्यांचा पूर्ण विरोध होता. माणूस आणि माणूस, माणूस आणि समाज, व माणूस आणि निसर्ग यात कुठलाही संघर्ष असू शकत नाही असा 'परमसाम्य' विचार आपल्यासमोर गांधीजींनी ठेवला.

प्रस्तावनेत उल्लेख केल्याप्रमाणे, संपूर्ण पुस्तक वाचताना लेखकाचा कल गांधी-विनोबांच्या विचाराकडेच झुकलेला आहे. लेखकाने आपली विचारदिशा ठरविताना उल्लेख केलेले संदर्भ व त्यातून काढलेले निष्कर्ष कितपत प्रस्तुत आहेत याचा विचार करावा लागेल. उदाहरणार्थ, *लिमिट्स टु ग्रोथ* या पुस्तकाचा संदर्भ जागोजागी दिला आहे. परंतु या पुस्तकातील अनेक उणिवा २५ वर्षांनंतर केलेल्या एका अभ्यासात अधोरेखित केल्या आहेत. मुळात हे पुस्तक mathematical analysis and simulation studies चा गोषवारा आहे. अशा प्रकारच्या विश्लेषणात्मक अभ्यासात अनेक गृहीतकांचा समावेश असतो. त्यांतील एखादे जरी अपूर्ण असले तरी संपूर्ण ढाचा कोसळतो.

जगवुडीचे भविष्यवेध घेण्याचे अनेक प्रयत्न यापूर्वीही झालेले आहेत. विज्ञान-तंत्रज्ञानावर अनेक दोषारोप झालेले आहेत. आधुनिक विचारपद्धती, लोकशाही, समाजवाद यांवरही तिरस्कारयुक्त नजरेने पाहणारे अनेक आहेत. परंतु सर्वसमावेशक असा ठोस पर्याय अजूनही कुणी समोर ठेवला नाही. जगातील अर्ध्या-अधिक लोकांच्यापुढे अन्न, पाणी, आरोग्य, शिक्षण या दैनंदिन समस्या आ वासून उभ्या आहेत. त्यामुळे त्यांना इतर कुठलेही दूरगामी विचार जवळचे वाटत नाहीत. वदलत्या संदर्भात आज कुठलाही 'इझम' आपले संपूर्ण समाधान करू शकत नाही. त्यात 'गांधीझम'चा ही समावेश आहे.

तरीसुद्धा सर्व मानवजातीला कवेत घेणारा, जीवन व्यवहाराशी अत्यंत जवळीक असणारा, जनसामान्यांना आत्मसन्मानाने वागविणारा गांधीवाद आपल्याला भावणारा आहे. गांधीवादाकडे अनेक समस्यांचे उत्तर असून त्याची योग्य कार्यवाही करणे हाही एक उपाय करून वघायला हवा हे लेखकाचे म्हणणे आपल्याला थोड्या विचारांती पटू लागते.

***प्रभाकर नानावटी***




**सर्व धर्म अध्ययन केंद्र**

**हिंदू धार्मिक परंपरा आणि सामाजिक परिवर्तन**

मे.पुं. रेगे

(पृष्ठे ११६; किंमत रु. २५.००)

**बौद्ध धर्माचा अभ्युदय आणि प्रसार**

प.ल. वैद्य

(या विषयावरील एका मौलिक परंतु दुर्मिळ ग्रंथाचे पुनर्मुद्रण. किंमत रु. ३०.००)

संपर्कासाठी पत्ता : **सचिव, प्राज्ञपाठशाळा मंडळ, ३१५ गंगापुरी, वाई ४१२ ८०३ (जि. सातारा)**










राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

